






नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)

महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

सदर प्रकल्पांतर्गत महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे ह्या संस्थेद्वारे प्रकाशित करण्यात येणाऱ्या महाराष्ट्र साहित्य पत्रिका ह्या नियतकालिकाच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात उपरोक्त संस्थेला आवाहनपर विनंती करण्यात आली होती.

सदर विनंती मान्य करून महाराष्ट्र साहित्य परिषदेद्वारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. हे अंक सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुररस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर/ संस्थांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.

अनुक्रमणिका








महाराष्ट्र-साहित्य-परिषदेच्या वतीने प्रकाशित होणारें त्रैमासिक

# महाराष्ट्र साहित्य-पत्रिका

वर्ष २३, अंक २ रा जुलै-सप्टेंबर १९५०

९५



संपादक
रामचंद्र शंकर वाळिंबे








## संपादक मंडळ

रा. शं. वाळिंबे (अध्यक्ष)
वि. स. खांडेकर
श्री. शं. नवरे
द. रा. कानेगांवकर
अ. गं. मंगरूळकर

साहित्य परिषदेचें नवें प्रकाशन

# संत वाङ्मयाची सामाजिक फलश्रुति

लेखकः— प्रा. गं. बा. सरदार.

मूल्य रुपये दोन

सभासदांस दीड रुपया ( ट. ख. वेगळा )

मुद्रकः— लक्ष्मण नारायण चापेकर, आर्यसंस्कृति मुद्रणालय, लि०,
१९८/१७, सदाशिव पेठ, टिळक रस्ता, पुणें २.
प्रकाशकः— वा. दा. गोखले, चिटणीस, महाराष्ट्र-साहित्य-परिषद्,
टिळक रस्ता, पुणें २.

अनुक्रमणिका



# महाराष्ट्र
# साहित्य – पत्रिका

वर्ष २३, अंक २ रा — जुलै–सप्टेंबर १९५०


## संपादकीय टिपणें

गेल्या जुलै महिन्यांत साहित्यपत्रिकेचें संपादकत्व मीं स्वीकारिल्यापासून 'पत्रिकेच्या स्वरूपांत कांही बदल घडवून आणणार आहांत काय?' अशी पृच्छा करणारीं कांही पत्रें माझ्याकडे आलीं. अशीं पत्रें पाठविणारे गृहस्थ पत्रिकेचा उत्कर्ष व्हावा याच हेतूने प्रेरित झालेले असतात हें अगदी खरें आहे. पत्रिकेच्या स्वरूपांत कालोचित असे आकर्षक फेरबदल घडवून आणावयास पाहिजेत असें सर्वसामान्य वाचकांच्या संतोषासाठी मान्य केलें तरी याबाबतींत आणखी कांही मुद्दे अवश्य विचारांत घ्यावयास पाहिजेत असें मला वाटतें. लघुनिबंध, लघुकथा, एकांकिका, छोटीं प्रहसनें, विनोदी चुटक्यांचे 'पाझर', मागील अंकावरून पुढें चालू राहणारी कादंबरी, नाट्यछटा इत्यादि आकर्षक सदरें पत्रिकेच्या अंकांमध्यें दिसत नसल्यामुळें पत्रिकेच्या साध्या वाचकाच्या मनांत रुखरुख कायम राहणें स्वाभाविक आहे. तथापि केवळ वर उल्लेखिलेल्या आकर्षक सदरांनाच संपूर्णपणें वाहिलेलीं अनेक बरींवाईट मासिकें सध्या महाराष्ट्रांत चालू आहेत. हीं मासिकें सामान्य वाचकाला लागणारें खुसखुशीत साहित्य उदारपणें पुरवीत आहेत. यामुळे ललित साहित्यावर मायेचें चांगलें जाडजूड पांघरूण घातलेलें दिसून येतें. वाली नाही तो विचारगर्भ, भारदस्त, तात्त्विक निबंधाला व शास्त्रीय संशोधनाला. अशा स्थितींत व्याकरणशास्त्र, छंदःशास्त्र, भाषाशास्त्र, व्युत्पत्तिशास्त्र, पारिभाषिक संज्ञांचें शास्त्र, टीकाशास्त्र, समाजशास्त्र इत्यादि शास्त्रांत पारंगत असलेल्या व्यासंगी व बहुश्रुत विद्वानांनी अनेक वर्षें मेहनत करून जें बहुमोल ज्ञान संपादित केलेलें असतें व सामाजिक संस्कृतीच्या व व्यक्तिमनाच्या विकासाच्या दृष्टीने ज्याचें महत्त्व थोर असतें अशा ज्ञानाचा प्रसार महाराष्ट्रसाहित्यपत्रिकेतून झाला नाही तर तो अन्य कोणत्या साधनाने होईल? या प्रकारच्या संचित ज्ञानाची समाजाच्या बौद्धिक विकासाच्या दृष्टीने गरज आहे की नाहीं? जर अशी गरज आहे हें मान्य झालें तर मग ती पूर्ण करण्याचें हुकमी साधन कोणतें असा प्रश्न उपस्थित होणारच. 'पत्रिका' हें तें महत्त्वाचें साधन होय असें माझें या प्रश्नाला उत्तर आहे. सबब वर उल्लेखिलेल्या बहुमोल ज्ञानाचा प्रसार करणें हें पत्रिकेचें सर्वांत महत्त्वाचें ध्येय होय असें निर्भ्रांतपणें म्हणावेंसें वाटतें.

* * *

अनुक्रमणिका



हें साधल्यानंतर, विषयांचें वैचित्र्य जेणेंकरून साधतां येईल अशा गोष्टी करण्याची कोशीस केली पाहिजे हें मला पूर्णपणें मान्य आहे. यासाठीं व्यासंगी व बहुश्रुत विद्वानांच्या सहकार्याची अत्यंत जरूर आहे हें आवर्जून स्पष्ट करण्याचें कारण आहे असें नाहीं. असें सहकार्य पत्रिकेला नित्य मिळत गेलें तर लेखांची विविधता आपोआप निर्माण होईल. पत्रिकेकडून आर्थिक मोबदला मिळणें शक्य नाही ही खूणगांठ बांधून व महाराष्ट्रांतील प्रातिनिधिक साहित्यसंस्थेच्या वतीने प्रसिद्ध होणाऱ्या या त्रैमासिकाच्या सर्वांगीण उन्नतीच्या बाबतींत आपलेंहि कांही कर्तव्य आहेच आहे या उदार भावनेने प्रेरित होऊन ज्ञानाच्या निरनिराळ्या शाखांमध्यें आपलें जें कार्य चालू असेल त्याचा कांही अंश पत्रिकेच्या द्वारें महाराष्ट्रीयांच्या सेवेस सादर करावा अशी तळमळ थोरांच्या मनांत निर्माण झाली कीं, हें कार्य सुकर झालेंच म्हणून समजावें ! विद्वज्जनांना केलेली ही विज्ञापना वाया जाणार नाहीं अशी आशा बाळगण्याखेरीज आणखी काय करतां येणार ?

* * *

आनंदाची गोष्ट अशी कीं, या चालू अंकाच्या निमित्तानें अनेक विद्वानांनी व व्यासंगी लेखकांनी अगदी त्वरेने भरपूर सहकार्य केलें आहे. ज्याला म्हणून मी कांही विनंति केली त्याने ती तत्काल मान्य केली व लगेच त्या मान्यतेला कृतीची जोड दिली. यामुळे या अंकांत विषयांच्या बाबतींत बरीचशी विविधता निर्माण झाली आहे हें कोणाच्याहि सहज लक्षांत येईल. परीक्षण-विभाग हा तर मोठाच आकर्षक विभाग. याहि विभागांत डोळ्यांत भरण्याजोगें लेखन या अंकांत पुरवितां आलें आहे. हें सारें केवळ थोर लेखकांच्या प्रेममूलक सहकार्यानेच शक्य झालें आहे. असेंच भरीव सहकार्य नित्य मिळत गेल्यास पत्रिकेचें स्वरूप वाटेल तेवढें आकर्षक करतां येईल हें काय सांगावयास पाहिजे ?

* * *

प्रसिद्ध 'किर्लोस्कर' मासिकाला १ ऑगस्ट १९५० रोजीं तीस वर्षें पूर्ण झालीं. सतत तीस वर्षें 'किर्लोस्कर' मासिक महाराष्ट्रीयांची अत्यंत नियमितपणें अविरत सेवा करीत आलें आहे. या दीर्घ काळांत मनोरंजनपर लेखनाच्या जोडीला नवीन युगाला अनुरूप असें भरपूर विचारप्रवर्तक लेखन 'किर्लोस्कर' मासिकानें वाचकांच्या पदरांत टाकलें आहे. नवसमाज-निर्मितीसाठीं अत्यंत आवश्यक असलेले सडेतोड विचार धीरानें प्रकट करून अंधश्रद्धा व शब्दप्रामाण्य यांच्याविरुद्ध 'किर्लोस्कर' मासिकाने कांही काल मोठीच चढाई केली. याच्याच जोडीला आपल्याकडे औद्योगिक स्वातंत्र्य ज्यायोगे प्रस्थापित होईल अशा गोष्टींचा पुरस्कार करणारें वाङ्मयहि 'किर्लोस्कर'ने मोठ्या प्रमाणावर प्रसिद्ध केलें. अनेक प्रसिद्ध कादंबरीकार व लघुकथाकार यांच्या आकर्षक लेखनानें जनमनाचें रंजन 'किर्लोस्कर'ने ज्याप्रमाणे केलें त्याचप्रमाणे अनेक महत्त्वाच्या विषयांवर चर्चा (Symposium) करवून सामान्य वाचकांनाहि विचारोन्मुख केलें. 'किर्लोस्कर'ची ही विविध कामगिरी अनेक दृष्टींनी संस्मरणीय झालेली आहे. ज्या कर्तबगार मंडळीच्या परिश्रमामुळें 'किर्लोस्कर' मासिकाला ही कामगिरी करतां आली त्यांचें मनःपूर्वक अभिनंदन करून या उच्च प्रतीच्या मासिकाचा सर्व दृष्टींनी स्पृहणीय उत्कर्ष होवो अशी या निमित्ताने इच्छा व्यक्त करितों.

* * * *

गेल्या कांही महिन्यांत मराठीमध्यें ज्या कादंबऱ्या प्रसिद्ध झाल्या त्यांत विभावरी शिरूरकर यांनी लिहिलेल्या ' वळी ' या कादंबरीची उंची फार मोठी आहे. क्रिमिनल ट्राइब सेटल्मेंट सारख्या अत्यंत उपेक्षित, तिरस्कृत व बहिष्कृत वस्तींतील दृश्याचें व व्यक्तींचें पराकाष्ठेचे वास्तववादी व सर्वत्र सहानुभूतीच्या ओलाव्याने ओथंबलेलें वर्णन हा या कादंबरीचा सर्वांत महत्त्वाचा विशेष होय. दलित समाजाचें वर्णन करणाऱ्या कादंबरीच्या कथानकाला रंगदारपणा व ढंगदारपणा यावा म्हणून त्याला अनेक ' रोमँटिक ' व अस्वाभाविक घटनांची चुरचुरीत फोडणी देऊन सामान्य वाचकांच्या चित्तवृत्ति उल्हसित करण्यासाठी निरनिराळ्या कलात्मक क्लृप्त्या योजण्याची आपल्याकडील कांही लेखकांना भारी हौस असते. प्रस्तुत 'वळी' या कादंबरींत लेखिका यापैकीं एकाहि कृप्तीच्या आहारीं गेलेली नाहीं. दलित समाजाच्या दैनंदिन जीवनांतील विविध घटनांचें अत्यंत वास्तववादी वर्णन कलेची हानी थोडी सुद्धा होऊं न देतां करतां येते हें या कादंबरीने पूर्णपणें सिद्ध केलें आहे. कादंबरीचा शेवट कांहींना परिणामाच्या दृष्टीने हिणकस वाटेल हें खरें असलें तरी आपली उन्नति करून घेण्याची तीव्र लालसा बाळगणाऱ्या आत्यंतिक ध्येयवादी दलित मनुष्याच्या मार्गांत केवढ्या विलक्षण अडचणी असतात, व त्यांच्याशीं कलह करून त्यांच्यावर मात करण्याचें सामर्थ्य नसल्यामुळे अशा मनुष्याचीं उच्च ध्येयेंच त्याच्यावर कशीं उलटतात, आणि अंतीं त्यांच्या नाशास कशीं कारण होतात याची ही कहाणी हृदयद्रावक आहे !

* * *

बोलपटांनी पराक्रमाची शर्थ करून मराठी रंगभूमी सर्वस्वी नामोहरम करून टाकलेली असल्यामुळे नाटकें पाहण्यासाठी आसावलेले प्रेक्षक अलीकडे कोणत्याहि नाटकाच्या वेळीं पुण्यांतील एकुलत्या एक नाट्यगृहांत गर्दी करतात, व बहुतेक प्रसंगीं निराशा विकत घेऊन परत येतात; आणि पैसे वाया गेले म्हणून उगाच हळहळत बसतात. परंतु पुन्हा नवीन नाटक लागलें कीं, पूर्वस्मृतींवर बळेंच जाड पडदा टाकून नव्या उत्साहाने ही मंडळी नाट्यगृहाशीं घुटमळतांना दिसूं लागतात. लोकांचा यांत कोणताहि दोष नाहीं. नाटक तें नाटक ! सिनेमाने कितीहि धडपड केली तरी नाटक पाहण्याची लालसा कमी होईल अशी भीति वाटण्याचें कारण नाहीं. साडेनऊ वाजतां पहिली घंटा झाली आणि प्रेक्षकांच्या गर्दीबरोबर आपण आपल्या आसनावर विराजमान झालों म्हणजे समोर दिसणारा पडदा, ऑर्केस्ट्राची रिकामी जागा, किंवा त्या जागेंतील एखादें वाद्य इत्यादि आतां वैभवशून्य व कांहीशा कळाहीन गोष्टी पाहिल्या तरी देखील सर्वांगांत कसली तरी गोड लहर चमकून जाते; आणि मराठी रंगभूमीच्या ऐन अमदानीच्या शेवटीं शेवटीं रेंगाळणाऱ्या मधुर वातावरणाच्या गोड स्मृतीनें मन मोहरून जातें. मला वाटतें, प्रत्येक रसिकाला हा अनुभव थोड्या फार प्रमाणांत येत असलाच पाहिजे. आणि पूर्वस्मृतींना उजळा देऊन, पुन्हा त्याच थरारणाऱ्या तल्लीनतेचा थोडासा साक्षात्कार होईल या वेड्या आशेने आजहि आपण नाट्यगृहाच्या दाराशीं उत्कंठेंने गर्दी करीत असतों— पुन्हा पुन्हा निराशा झाली तरीहि सारें विसरून गर्दी करीत असतों ! मधून मधून एखादा चांगला प्रयोग पाहिल्यावर मात्र हायसें वाटतें ! कांही महिन्यांपूर्वी श्री. के नारायण काळे व लीला चिटणीस यांनी 'फास' या नाटकाचा जो प्रयोग करून दाखविला तो 'क्लॅसिक' याच सदरांत पडेल इतका चांगला वठला. सामान्य प्रेक्षकाचें मन ज्यांच्यायोगें उल्हसित होईल अशा गोष्टी या नाटकांत फार थोड्या असल्यामुळें त्यांना तो आवडला नाहीं हें रास्तच झालें.

पण जाणत्या रसिकांच्या मनाची पकड घेऊं शकतील अशा अनेक गोष्टी या प्रयोगांत होत्या हें कबूल करावयास पाहिजे. यानंतर गेल्या १५ ऑगस्ट रोजीं सौ. मुक्ताबाई दीक्षित यांनी लिहिलेल्या 'जुगार' या नाटकाचा पहिला प्रयोग अगदीं उत्कृष्ट झाला. प्रयोगाच्या यशस्वितेचें बहुतेक सारें श्रेय श्री. केशवराव दाते यांचें आहे हें कबूल केलें तरी मुळांत नाट्यवस्तूहि चांगली आहे, आणि म्हणूनच प्रयोग रंगत गेला हेंहि कबूल करावयास पाहिजे. पहिली बायको जिवंत असतां दुसरी बायको करणें हा जुनाच विषय प्रस्तुत नाटकांत असला तरी यापूर्वी कोणत्याहि मराठी नाटककाराने अथवा कादंबरीकाराने सदर विषयाचे जे अगदी आंतले पापुद्रे उकलून दाखविले नव्हते ते सौ. मुक्ताबाई दीक्षितांनी मोठ्या कौशल्याने उकलून दाखविले आहे. 'क्लॅसिकल आर्ट' मध्यें आटोपशीरपणा व कलात्मक संयम दिसून येतात. याच गोष्टी याहि नाटकांत भरपूर दिसून येतात. इंग्रजींत ज्याला 'डिस्कशन प्ले' म्हणतात त्या प्रकारचें हें चर्चाप्रधान नाटक असलें तरी आकर्षक संवादांच्या व घटनांच्या कलापूर्ण मांडणीच्या योगाने लेखिकेने नाटक कोठेंहि कंटाळवाणें होऊं दिलें नाही. प्रयोगाच्या आटोपशीरपणाच्या दृष्टीने या नाटकांतील चैतन्य हें पात्र सहज गाळतां आलें असतें. या नाटकांतील आणखी एक विशेष म्हणजे ज्या किशोरीमुळें नाटक निर्माण झालें तीच सबंध नाटकांत एकदाहि रंगभूमीवर प्रवेश करीत नाही; आणि इतकें असूनहि तिचें अस्तित्व मात्र पदोपदीं जाणवल्याशिवाय राहत नाहीं. ही युक्ति लेखिकेने फार चांगल्या प्रकारे योजिली आहे. नाटकांतील भाषेचें सौंदर्य भोवतालच्या इतर सौंदर्याला साजून दिसणारेंच आहे. फार दिवसांनीं एका चांगल्या प्रकारें लिहिलेल्या नाटकाचा तितकाच चांगला प्रयोग पाहिला !

* * *

साम्यस्थळें ( Parllelisms ) हुडकून काढणें हा वाङ्मयाच्यां क्षेत्रांतील एक केवळ करमणुकीचा विषय आहे. उसनवारी असेल किंवा नसेल. तें सिद्ध करतां आलें नाही तरी दोन भिन्न देशांतील व भिन्न काळांतील लेखकांच्या वाङ्मयांत एखाद्या ठिकाणीं डोळ्यांत भरण्याजोगें साम्य दिसून आलें म्हणजे भरपूर करमणूक होतें यांत शंका नाहीं. रेस्टोरेशन पीरियडमधील प्रसिद्ध नाटककार कॉंग्रीव्ह याचें ' द वे ऑफ् द वर्ल्ड ' हें नाटक वाचीत असतां पुढील उताऱ्याने माझें चित्त एका निराळ्याच कारणाकरतां वेधून घेतलें. हा उतारा वाचीत असतां, असेंच कांही तरी गडकऱ्यांच्या एका नाटकांत आपण वाचलें आहे असें मला वाटूं लागलें; आणि थोडक्याच वेळांत संशय फिटला व खात्रीच झाली. कॉंग्रीव्हच्या नाटकांतील उतारा पुढीलप्रमाणें आहे.

*Lady Wishfort.* How do I look, Foible? *Foible.* Most killing well, madam. *Lady W.* Well, and how shall I receive him? In what figure shall I give his heart the first impression?...... Shall I sit?—no, I won't sit — I'll walk — I'll walk from the door upon his entrance; and then turn full upon him — no, that will be too sudden. I'll lie — ay, I'll lie down...... There's a couch — yes, I'll give the first impression on a couch. I won't lie neither, but loll and lean upon one elbow; with one foot a little dangling off......"

अनुक्रमणिका

आता या उताऱ्याची व गडकऱ्यांच्या ‘ पुण्यप्रभाव ’ नाटकाच्या तिसऱ्या अंकाच्या तिसऱ्या प्रवेशातील किंकिणीच्या स्वगत भाषणाची गमतीनें तुलना करून पाहावी.

**किंकिणी**—( स्वगत ) अशी वीणा घेऊन सरस्वतीसारखी बसलेलीच बरी, कां चित्रांतल्या कौसल्येसारखी मनगटावर पोपट घेऊन बसूं ! पण आयत्या वेळीं पोपट कुठला मिळायला ! मग राजासारखी वीरासन घालून नुसतें फूलच घेऊं असें हातांत ? तें मेलें जरा आडदांडासारखें दिसेल ! अशी पडून, पंख्यानें वारा घेत राहिलें तर ? ... ... वृंदावन बघायला आले तेव्हां कालिंदीबाईसाहेब कशा बसल्या असतील कोणास ठाऊक ? ... ...

वरील दोन उताऱ्यांतील साम्य लक्षांत येण्यासारखें आहे. पण केवळ करमणूक यापेक्षां या साम्यदर्शनाचा अन्य कोणताहि हेतु नाही हें मात्र वाचकांनी विसरूं नये.

* * *

जगद्विख्यात ‘ जी. बी. एस्. ’ यांचा नुकताच ९४ वा वाढदिवस साजरा झाला. १८७५ पासून गेलीं ७५ वर्षें अविरत वाङ्मयसेवा करणाऱ्या या महान् नाटककाराच्या व प्रज्ञावंताच्या विविध कामगिरींचा आढावा घेऊन मराठी वाचकांना त्याचा उत्कृष्ट परिचय कोणी तरी आतां करून द्यावयास पाहिजे. इंग्रजी भाषेचा व वाङ्मयाचा व्यासंग करण्यांत ज्याची सारी हयात गेली अशा एखाद्या परिणतप्रज्ञ इंग्रजीच्या प्रोफेसराने हें अत्यंत महत्त्वाचें काम करावयाचें नाही तर तें दुसऱ्या कोणीं करावयाचें ? यायोगें दोन गोष्टी साध्य होतील. एक म्हणजे मराठी वाचकांची सोय होईल; आणि दुसरी म्हणजे प्रोफेसर मजकुरांनीं हयातभर संचित करून ठेवलेल्या टीकाशास्त्रीय ज्ञानाची उंची कळून आल्यामुळें सध्या अडखळत चालणाऱ्या अर्धवट मराठी टीकाकाराला विशेष कर्तबगारी करून दाखविण्याची ईर्ष्या उत्पन्न होईल. आतां मराठीसारख्या खेडवळ मापेंत उच्च प्रतीचें लेखन करूं पाहणें हा आपल्या प्रज्ञेचा व शैलीचा उपमर्द आहे असाच दावा एखाद्या पंडितंमन्यानें केल्यास त्याला इलाज नाहीं !

* * *

या निमित्तानें शॉच्या गाजलेल्या ‘ टेबल-टॉक् ’ मधील एका गमतीदार व खोचक संवादाची मला आठवण झाली. ‘ साहित्यांतील संप्रदाय ’ या माझ्या नवीन ग्रंथांत शृंगारिक वाङ्मयाची प्रसंगोपात्त चर्चा करीत असतां शॉच्या एतद्विषयक मताचा मी ओझरता उल्लेख केला होता. शॉचा चारित्रकार हेंडरसन् व स्वतः शॉ यांच्यामध्यें झालेला संवादच पुढें देतों. या संवादांतून अनेकांना अनेक प्रकारचा बोध प्राप्त होईल. ज्याने त्याने आपल्या ऐपतीप्रमाणें तो पचवावा.

**हेंडरसन**—सध्या वाङ्मय अवनतीच्या मार्गाला लागलें आहे याविषयीं मला शंका वाटत नाही. अगदी हीन अभिरुचीने व उच्छृंखल अश्लीलतेने ओतप्रोत भरलेल्या आणि सुसंस्कृत मनाला धक्का देणाऱ्या कादंबऱ्या प्रत्येक स्टॉलवर दिसतात. तुमच्या ‘ साध्याभोळ्यां ’ मुलीला असल्या कादंबऱ्या कोणालाहि संशय येऊं न देतां अगदी सहज विकत घेतां येतात. असल्या पुस्तकांची बेरेमाप स्तुति होते आणि त्यांचा खपहि भरपूर होतो. ...सत्याचा आविष्कार करण्यांत लेखकाचा हेतु कितीहि उदात्त असला तरी त्याचा समाजावर मात्र वाईट परिणाम होण्याची भीति आहे. या प्रकाराच्या मुळाशीं फ्रॉयडचा ‘ लिबिडो संप्रदाय ’ आहे असें मला वाटतें. प्रचलित वाङ्मयावर या संप्रदायाचा वाईट परिणाम होत आहे असें तुम्हांस वाटत नाही काय ?

शॉ—... ... तुम्ही ज्याचा उल्लेख केला त्यापैकी बरेचसें वाङ्मय शास्त्रीय नसून तीं शास्त्रीय वाङ्मयाची केवळ थट्टाच असते. तथापि रोमँटिक वाङ्मयानें जेवढें नुकसान होईल तेवढें नुकसान असल्या अर्धवट शास्त्रीय वाङ्मयानें मुळीच होणार नाही.

हेंडरसन—... ... वास्तववादी व रोमँटिक हे वाङ्मयप्रकार आजच्या मुलांना व मुलींना विकृत व अनीतिमान करीत असतील तर त्यांच्या आईबापांनीं त्यांच्यावर अधिक लक्ष ठेवावयाला नको काय ? अशा वाङ्मयावर हल्लीपेक्षा अधिक नियंत्रण ठेवावयास नको काय ? उत्तान शृंगारानें भरलेल्या कादंबऱ्यांविरुद्ध सध्याच प्रतिक्रिया झालेली दिसत आहे.

शॉ—'प्रतिक्रिया' हें अगडबंब नांव देऊन या प्रकाराची प्रतिष्ठा उगाच कां वाढवितां ? जें झालें आहे तें इतकेंच की, उत्तान वैषयिक गोष्टींची भरपूर चर्चा करण्याइतपत आज छापखान्यांना स्वातंत्र्य मिळालें आहे; आणि याचा पुरेपूर फायदा घेण्यासाठी लेखकांमध्ये स्पर्धा चालू आहे. माझ्या एका नाटकांतील एका पात्राला ज्याप्रमाणें केवळ एकच विषय माहीत होता त्याप्रमाणें अशा लेखकांनाहि एकच एक विषय माहीत असतो. लैंगिक गोष्टींची कसलीच चर्चा होणें ज्यावेळीं सर्वस्वीं अशक्य होतें त्यावेळीं असली चर्चा म्हणजे जगांतील परमरमणीय गोष्ट होय असें अनेकांना वाटत असे. पण खरें म्हणजे हा जगांतील सर्वांत कंटाळवाणा विषय आहे ! वैषयिक गोष्टींच्या वर्णनांशीं संबद्ध असलेले सुख भोगावयाचें असतें—केवळ पुस्तकांत वाचावयाचें नसतें ! एखाद्या चित्रपटाच्या शेवटीं एखादा तरुण मिस् मेरी पिक्फोर्डचें चुंबन घेत असतां त्या तरुणाकडे डोळे फाडफाडून नुसतें बघण्यांत काय मतलब आहे ? मेरी पिक्फोर्डचें चुंबन घेण्यांत मजा आहे हें मान्य; आणि दुसरें कोणी जवळ नसेल तेव्हां तिला न्याहाळून पाहाण्यांतहि खूपच सुख असेल हेंहि खरें. परंतु दुसरा एखादा पुरुष तिचें चुंबन घेत असतां त्याच्याकडे नुसतेंच बघत बसणें हें अगदीं असभ्य आहे, इतकेंच नव्हे तर निराशेच्या तीव्र वेदना निर्माण करणारें आहे. पण असल्या गोष्टी एक वेळ चित्रपटांत पाहिलेल्या पुष्कळ बऱ्या. परंतु त्या चित्रपटांत प्रत्यक्ष न पाहतां त्यांचें केवळ शाब्दिक वर्णन कादंबरीमध्यें वाचीत बसणें हा शुद्ध गाढवपणा आहे. उत्तान शृंगारानें परिपूर्ण असलेली कादंबरी मनांत जी वैषयिक क्षुधा निर्माण करते ती त्या कादंबरीला कधींच तृप्त करतां येत नाही. अतिशय भुकेलेल्या माणसाला एखाद्या थाटाच्या मेजवानीचें नुसतेंच रसभरित वर्णन ऐकवण्यासारखेंच हें आहे ! जरी हें वर्णन अगदी वास्तववादी असलें तरी भुकेलेल्या माणसाची भूक त्यामुळे कशी तृप्त होणार ? आपण काय लिहीत आहों याचाच ज्यांना कधींहि पत्ता लागलेला नसतो असेच लोक असलीं वर्णनें वाङ्मयांत करीत असतात आणि यामुळे जे लोक त्यांच्या इतकेच अननुभवी असतात तेच केवळ अशा भडक वर्णनांना भुलतात.

'रोमान्स' हें मोठें घातुक प्रकरण असून त्याची कलेच्या व जीवनाच्या क्षेत्रांतून हकालपट्टी झाली पाहिजे असें मत बाळगणाऱ्या शॉचे शृंगारिक कादंबरीच्या बाबतींतील वर उद्धृत केलेले विचार अनेकांना झोंबले तरी त्यांच्यांत बरेंचसें तथ्य आहे हेंहि मान्य करणें भाग आहे. अतिरिक्त शृंगारिक व वाचकांच्या वासना चाळविणाऱ्या वाङ्मयाच्या बाबतींत तर शॉचें म्हणणें अगदी खरें आहे हें नाकबूल करण्यांत कांही अर्थ नाही.

रा. शं. वाळिंबे

# मला वाटतें—



मला वाटतें माझ्यावाचुनि
या जगांतले सुखी इतर जन !
माझीं स्वप्नें, कवनें, गानें
चितारलेलीं पानें-पानें
सत्यापासुनि मज वेगाने
झुलवित नेतीं-भुलवित नेतीं,
सदा चांदणें मला दावितीं,
परंतु जेव्हां—
परंतु जेव्हां भर माध्यान्हीं
सत्याचें रविबिंब तळपुनी
भुका आंतल्या जाळित उठतें,
त्या प्राणांतिक आगीवर अन्
तेलापरि वर्षते उपेक्षा,
अशा घडीला मला वाटतें
माझ्यावाचुनि लहान मोठे
या जगांतले सुखी इतर जन !
त्या भ्रांतीने कातावुन मी
अपार्थिव अशा स्वप्नसख्यांची,
गानांची, पानापानांची
राख राख लावून कपाळा,
आसक्तीचा शाप लागुनी
भिकाऱ्यापरी फिरतों-झुरतों,
"द्या सत्यांतिल जीवनरस मज"
ओरडतो पण—पदरिं रितेंपण !
शून्याच्या मग पथारीवरी
अंग टाकितां वाटुं लागतें,
माझ्यावाचुनि लहान मोठे
या जगांतले सुखी इतर जन,
माझ्यावाचुनि सुखी इतर जन !

—संजीवनी



अनुक्रमणिका

# संवेदन

## कवि-मनाची एक घटना



लेखक—डॉ. के. ना. वाटवे

संपूर्ण झालेली कलाकृति आणि रसिकाच्या मनावर तिच्या आस्वादाने होणारा परिणाम या दोन गोष्टींवर पौरस्त्य साहित्यशास्त्राचा मुख्य कटाक्ष आहे. कविमनांत चाललेली त्या कलाकृतीची निर्मिति–प्रक्रिया आणि त्या निर्मितीला कारण झालेली कवि-कालीन परिस्थिति यांची फारशी दखल तें घेत नाहीं. फार झालें तर, काव्यनिर्मितीला प्रेरक होणाऱ्या प्रतिभा, बहुश्रुतता, परिश्रम, निरीक्षण, इत्यादि गोष्टींचा सर्वसामान्य उल्लेख तें करतें; आणि कलाकृतीच्या आत्म्यांत रस, ध्वनि, औचित्य इत्यादि तत्त्वें, आणि शरीरांत अदोष शब्दार्थ, वक्रोक्ति, अलंकार, इत्यादि गोष्टी समाविष्ट होत असल्याचें तें सांगतें. थोडक्यांत बोलायचें तर कवीशीं—म्हणजे त्याचें व्यक्तिमत्त्व, त्याचा काल, त्याची विशिष्ट परिस्थिति, त्यांचे विशिष्ट अनुभव इत्यादींशीं—संस्कृत साहित्यशास्त्राला फारसें कर्तव्य नाहीं. त्यामुळें कविमनाच्या निर्मितिप्रक्रियेचा किंवा त्याच्या तत्कालीन घटनेचा विचार आमच्याकडे फारसा नाहीं. सबंध कविचरित्रेंच आम्ही जेथें विसरून गेलों, तेथें विशिष्ट कवीच्या विशिष्ट काव्याच्या निर्मितीला नेमकें प्रेरक काय झालें; त्याचा त्यानें आपल्या कलाकृतींत उपयोग कसा करून घेतला वगैरे गोष्टींविषयीं आम्ही संपूर्ण अंधारांत आहों हें निराळें सांगावयासच नको.

पाश्चात्य साहित्यशास्त्रांत मात्र कवीवरच मुख्य कटाक्ष असल्यानें वरील गोष्टी तिकडच्या साहित्यशास्त्रांत आढळतात. ही जोड आपण आपल्या बनत असलेल्या मराठींतील टीकेला दिली पाहिजे. यासाठीं 'संवेदन' नांवाच्या काव्यनिर्मितीच्या प्रारंभीच्या अवस्थेचा—किंवा कविमनाच्या संघटनेचा विचार करण्याचें येथें योजलें आहे. Sensation या इंग्रजी साहित्य-शास्त्रीय संज्ञेचें 'संवेदन' हें मराठी भाषान्तर आहे. पाश्चात्य मानसशास्त्र किंवा आपल्याकडील न्याय किंवा वेदान्त यांतील Sensation व संवेदन या परिभाषेशीं त्याचा स्थूल शब्दार्थापलीकडे फारसा संबंध नाहीं. कवि संवेदनशील असतो असें आपण म्हणतों. याचा अर्थ बाह्य जगांतील वस्तूंचे आणि प्रसंगांचे संस्कार त्याच्या मनावर लवकर, स्पष्ट आणि खोल होतात असा होतो. त्याचें मन सूक्ष्मग्राही, शीघ्रवेदी व संस्कारक्षम असतें. तरल आणि तल्लख इंद्रियांच्या द्वारा अशा कविमनावर बाह्य जगाचे उमटणारे स्पष्ट व खोल संस्कार म्हणजे संवेदन असें स्थूल मानानें प्रथम समजूं या.

पण संवेदनेची ही व्याख्या केवळ प्राथमिक म्हणूनच स्वीकारली पाहिजे. कारण येवढ्यानें काव्यनिर्मितीचा आरंभ कसा होतो येवढेंच कळतें. पण हें कळणें म्हणजे फारच थोडें कळणें होय. नुसता संवेदनशील कवि आपल्यावरील संस्कारांच्या साहाय्यानें बाह्य निसर्गाचीं व प्रसंगाचीं तपशीलवार व हुबेहुब वर्णनें फार तर करूं शकतो. शब्द, स्पर्श, रूप, रस व गंध हे त्याला आपल्या पंचेन्द्रियांनीं उत्कट रूपांत ग्रहण करतां येतात, म्हणून नादाचा गोडवा किंवा

कर्कशपणा, स्पर्शाची शीतलाई किंवा दाह, रूपाचा रंग किंवा इतर बारकावा, रसाची मधुरता किंवा प्रतिकूलता व गंधाची मादक माधुरी किंवा उग्रटपणा तो हुबेहूब वर्णील. येवढ्या भांडवलावर कवीला केवळ इंद्रियसंवेद्य (Sensuous) काव्य करतां येतें. पण हें असलें काव्य म्हणजे खरें संपूर्ण काव्य नव्हे व असलें संवेदन हेंहि खरें संपूर्ण संवेदन नव्हे. रॉझेटी, कीट्स, बालकवि इत्यादि कवींच्या काव्यांत वरील प्रकारचें संवेदन थोडें जास्त असतें. कांही कवि उत्तान शृंगाराचें वर्णन करून प्रेमाचें इंद्रियगम्य स्वरूप चित्रित करतात. अशा काव्यस्थलास येथल्या निराळ्या अर्थी Sensuous म्हणजे वैषयिक काव्य म्हणतात. पण नुसती इंद्रियसंवेद्यता हा काव्याचा गाभा नव्हे. पण हेंहि कबूल केलें पाहिजे कीं कोणत्याहि सत्काव्याचा तो एक अविभाज्य विशेष आहे.

मग ज्याला खरें संपूर्ण संवेदन म्हणतात तें कोणतें? कवीच्या ज्ञानेंद्रियांनी बाह्य जगाचे संस्कार—जसेच्या तसे—आणून त्याच्या मनाला सादर केले कीं तें कविमन ते संस्कार जुळवितें, त्यांची संगति लावतें, त्यांना भावनेची ऊब देतें, कल्पनेची किमया त्यांवर करतें व प्रज्ञेच्या साहाय्याने त्या संस्कारांमधून एक साकार सगुण असा सुंदर आशय निर्माण करतें. कविमन एकदा संस्कारांनी जागें झालें कीं तें केवळ अवयवशः किंवा तुकडे पाडून वेगवेगळ्या हप्त्यांनी काम करीत नाही. मनाचा व्यापार म्हणजे नेहमी संपूर्ण मनाचा व्यापार. त्याचीं सर्व चक्रें एकदम फिरूं लागतात. त्यामुळें तर्क, भावना, कल्पना, इच्छाशक्ति, अन्तःस्फूर्ति, प्रज्ञा इत्यादि मनाचीं सर्व केंद्रें एकदम जागृत होऊन संस्कारांची पिंजण आणि पुनर्घटना करूं लागतात. त्यामुळें कविमनांत प्रविष्ट झालेला संस्कार अगदी कोरा असा राहतच नाही. त्यावर वरील मानसशक्तींची कांहींना कांही तरी क्रिया घडून त्यांचें रूपान्तर झालेलें असतेंच. म्हणूनच हा संस्काराचा अंश, हा भावनेचा, हा कल्पनेचा, हा प्रज्ञेचा असें कलाकृतीचें अंशात्मक पृथक्करण विवेचनाच्या सोयीसाठीं आपण करीत असलों तरी मुळांत ती घटना अशी विभागबद्ध नसते. फारतर त्यांपैकीं एकेका शक्तीच्या प्रक्रियेचें प्राधान्य अमुक एका अंशांत आहे असें म्हणतां येईल. म्हणून इतर मानस शक्तींशी संमिश्र, किंचित् रूपान्तरित, तथापि संस्कारप्रधान असा कविमनांतील अंश म्हणजे संवेदन होय.

आतां या संस्कारप्रधान संवेदनेंत संस्कारांबरोबर इतर कोणते अंश असतात व त्यांचें निर्मिति-प्रक्रियेंत स्थान कोणतें तें पाहावयाचें. संवेदनेची क्रिया कविमनाइतकीच जुनी असली तरी तिला टीकाशास्त्रीय महत्त्व असें रोमँटिक युगांतच आलें. क्लॅसिकल युगांतील पारंपारिक बंधनांतून, संकेतांतून आणि ठरीव साच्यांतून काव्य आणि कवि मोकळे झाल्यावर एक नवें टीकाशास्त्रीय स्वरूप या युगांत अवतरलें. या टीकाशास्त्रांत कवि हा मुख्य विषय झाला. भोवतालच्या खऱ्याखुऱ्या जीवनाच्या व क्रिया प्रतिक्रिया प्रत्यक्षपणें कविमनावर काय परिणाम करतात व त्यांतून खरें अनुभवजन्य व जिवंत काव्य कसें निर्माण होतें याची समीक्षा सुरू झाली. ग्रीक-लॅटिन मधील जुन्यापुराण्या नियमांनी बद्ध झालेलें कलावंताचें व्यक्तिमत्त्व खुलें करण्याचें काम मोठ्या त्वेषाने व हिरीरीने करणारा कवि व टीकाकार बुइलियम् ब्लेक हा होय. त्याचा मुख्य भर कवीच्या कल्पनाशक्तीवर होता. जागृत कविकल्पनेला तो ईश्वरी साक्षात्कार समजे. कवीचीं संवेदनें, भावना व त्याचें चैतन्य यांनी उत्पन्न झालेल्या त्याच्या दिव्य दृष्टींतून कलेचा जन्म होतो असें तो मानी. संवेदनें हीं इंद्रियांपुरतीच मर्यादित कधींच राहत नाहीत असें त्याचें मत. म्हणून ज्या कल्पनेला तो कलेचा मुख्य प्रेरक हेतु मानतो त्या कल्पनेशीं संवेदनांना त्यानें एकरूप करून टाकलें आहे. तो म्हणतो—

'Imagination is spiritual Sensation'. अर्थात् ब्लेकची Imagination म्हणजे नुसती कल्पनाशक्ति नव्हे.

त्याचा अभिप्राय असा— खरें व्यापक व पूर्ण संवेदन हें सबंध कविमन वेढून राहिलेलें असतें. त्यांत कवीच्या शारीरिक, बौद्धिक, भावनात्मक व आत्मिक शक्तीहि एकसमयावच्छेदेंकरून व अविभक्तपणें स्फुरण पावलेल्या असतात. असें सर्वसमावेशक व सर्वात्मरूप (Spiritual) संवेदन म्हणजे ब्लेकची कल्पना. वर्ड्स्वर्थचा भर स्वयंस्फूर्त उत्कट भावनांवर असल्याने त्याने उत्कट भावनांची जनक कारणें म्हणून सुस्पष्ट, परिस्फुट आणि हुबेहुब (vivid) संवेदनांना आपल्या निर्मितिप्रक्रियेंत मानाचें स्थान दिलें आहे. वर्डस्वर्थप्रमाणें कोलेरिज्हि कवीच्या ऐंद्रिय संवेदनक्षमतेवर (organic sensibility) विशेष जोर देतो. कीट्सचें संवेदन-विषयक मत त्याच्याच एका भावनामय उद्गारांतून प्रगट झालेलें आहे. तो उद्गार असा— 'O for a life of sensations rather than of thoughts'. येथे संवेदनांचा अभिप्रेत अर्थ अंतःस्फूर्तिगर्भ ज्ञान (Intuitive perception), भावना व कल्पना यांनी युक्त अशी मनोवस्था असा घ्यावा असें कांही टीकाकारांचें मत आहे. कीट्सला काव्याच्या स्वयंस्फूर्ततेवर भर द्यावयाचा असल्यानें त्यानें संवेदनांतून तर्क, प्रज्ञा, पांडित्य असल्या वैचारिक अंशांना वगळलेलें आहे. स्फुरलेलें आणि जाणिवेने रचलेलें, आपोआप उचंबळलेलें व विचारपूर्वक घडविलेलें अशा काव्यांतील भेद त्याला दाखवावयाचा होता. त्याच्यामतें 'If poetry comes not as naturally as leaves to a tree, it had better not come at all.' यासाठीं कवीच्या स्वयंस्फूर्त संवेदनक्षमतेवरच त्याने विचारशीलतेपेक्षा जास्त भर दिला. (पण त्याचें हें मत पुढे बदललें हा भाग निराळा!) मिड्लटन् मरीच्या मतें कीट्सच्या या उद्गाराचा अर्थ असा— कीट्सला भावना व विचार यांचा संघर्ष असलेली मनोवस्था नको होती. तर त्याला असा संवेदनात्मक अनुभव पाहिजे होता कीं ज्यामध्यें विचारविकारांचाच नव्हे, तर संपूर्ण कविमनाच्या घटकांचा मिलाफ झालेला असेल. ('He is asking for a life of complete and undivided experiences' P. 279 'Shakespeare' by John Middleton Murry).

वरील विवेचनाचा इत्यर्थ असा की, संवेदन हें प्रारंभीं इंद्रियसंस्काररूप असलें तरी कविमनाशीं तें संलग्न झालें कीं, त्याच्यांत भावना, कल्पना, अन्तःस्फूर्ति, प्रज्ञा किंवा थोडक्यांत बोलावयाचें तर कवीचें संपूर्ण व्यक्तिमत्त्व समाविष्ट होऊन त्याची एक घटनाच बनते. (मतभेद असलाच तर तिच्यामध्यें कोणत्या मानस शक्तीचें प्रमाण किती एवढ्यापुरताच). आतां या घटनेचा कलानिर्मितींत कसा व किती उपयोग होतो येवढेंच पहावयाचें. तें पाहण्यापूर्वीं संवेदनेला आपण घटना म्हटलें याचें स्वारस्य काय तें स्पष्ट करूं. स्मरणाच्या साहाय्याने मनांत राहिलेले संस्कार, भावना आदिकरून मानस शक्तींशीं संबंद्ध झाले कीं पुढें त्या सर्वांची एक कायमची मनोघटना बनते; व त्या मनोघटनेला अनुलक्षूनच ज्ञानतन्तूंमध्यें एक कायमची रचना तयार होते. या ज्ञानतन्तुरचनेला Neural disposition म्हणतात. पूर्वी पाहिलेल्या प्रसंगाचें किंवा व्यक्तीचें त्यानंतर नुसतें श्रवण, वाचन किंवा मनन झालें तरी तेवढ्यानेहि ही ज्ञानतन्तुरचना जागृत होऊन पूर्व संस्कारांचें हुबेहुब चित्र मनश्चक्षूंपुढें उभे करते; इतकेंच नव्हे तर संवेदनेच्या घटनेंत समाविष्ट झालेल्या भावनानुरोधाने त्या त्या भावनांचे शारीरिक परिणामहि अनुभवावयास लाविते. अशा तऱ्हेने संवेदनेची ही घटना शारीर-मानस (psycho-physical disposition) आहे. तिच्यामुळे

कवीच्या ठायीं जिव्हाळा, उत्कटता, अनुभवजन्य सत्याचा पक्केपणा, आत्मप्रत्यय उत्पन्न झालेला असतो म्हणूनच संवेदन-प्रधान काव्यें कल्पनाप्रचुर, बुद्धिप्रधान किंवा पाण्डित्यप्रधान काव्यापेक्षा परिणामकारक होतात.दुसऱ्या प्रकारच्या काव्याच्या कर्त्यांना जगाचा जिव्हाळ्याचा अनुभव नसतो, त्या अनुभवानें त्यांचें मन व शरीरहि कधी थरारलेलें नसतें, त्या थरारण्याचा आणि त्या त्या संस्कारांचा पुन्हा पुन्हा अनुभव घेण्याचा ध्यास त्यांना लागलेला नसतो. ते नुसत्या कल्पनेच्या वावड्या उडवतात व शास्त्रांचीं प्रमेयें बोलतात; त्यामुळें त्यांचीं काव्यें बेचव, उथळ, असत्य व बेगडीं वाटतात.

तुकारामाच्याच भक्तिपर काव्याला येवढी गोडी का ? त्याच्या मुखांतून पडलेला प्रत्येक शब्द काव्य होऊनच बाहेर पडे तें कां ! तर पांडुरंग हें तुकारामाचें संवेदनच झालें होतें म्हणून. विटेवर उभ्या असलेल्या त्या 'सुंदर ध्याना'चे संस्कार त्याच्या भक्तिभावनेशीं, कल्पनेशीं, विवेकाशीं संलग्न होऊन त्या सर्वांची एक पक्की शारीर–मानस घटना त्याच्याठायीं तयार झाली होती. तीमुळें तुकारामाला पांडुरंग ध्यानीं, पांडुरंग मनीं, जागृतीं सपनीं पांडुरंग' दिसत होता. त्याची काया नुसत्या पांडुरंगस्मरणामुळे अष्ट सात्त्विक भावांनी नटत होती. यावरून रसांत अनुभावांचा ( म्हणजे भावनाजागृतीमुळें होणाऱ्या शारीरिक परिणामांचा ) उल्लेख का केलेला असतो हेंहि याने ध्यानीं येईल.

असो. ही संवेदन नांवाची शारीर–मानस घटना तीन स्वरूपांत काव्यानिर्मितीमध्यें दिसून येते. १ प्रतिमा—संवेदन, २ पात्र— संवेदन व ३ विषय—संवेदन किंवा विचार ( idea )—संवेदन. ( अनुक्रमें image-character-subject or idea—sensations )

( १ ) प्रतिमासंवेदनें प्रायः उपमा, रूपकें, उत्प्रेक्षा इत्यादि अलंकारांत उपमानें म्हणून येतात. कारण वर्ण्य उपमेय कथेंत असतें; पण उपमान मात्र स्वतः कवीच्या अनुभवाचें असतें. 'The hearts that spaniel'd me at heels, to whom I gave their wishes' (AC IV, XII 20-4) यांतील शेक्स्पिअरने वापरलेलें कुत्र्याचें उपमान त्याच्या अनुभवांतलें आहे. तोंडावर तुकडा फेकला कीं लाचारीने धन्याचे पाय चाटणाऱ्या कुत्र्याबद्दल शेक्स्पिअरला असलेली चीड त्या उपमानांतून व्यक्त होते. त्यामुळें त्या कुत्र्याची प्रतिमा त्या चिडीच्या संवेदनेशीं संलग्न होऊन रूपकद्वारा व्यक्त झाली. 'मध्ये श्यामः स्तन इव भुवः शेषविस्तारपाण्डुः' ( मेघ. १८ ), किंवा 'सद्यो वसंतेन समागतानां नखक्षतानीव वनस्थलीनाम्' ( कु. ३·२९ ) इत्यादि कालिदासीय उपमांतील स्तन व नखक्षतें हीं उपमानें कालिदासाच्या शृंगारिक प्रतिमासंवेदनांचीं उदाहरणें होत.

( २ ) प्रतिमांप्रमाणें काव्य—नाटकांतील पात्रांबाबतहि संवेदनांची घटना होते. शेक्स्पिअरचें क्लिओपॅत्रा हें पात्रसंवेदनेचें उदाहरण होय. एकाद्या पात्राबद्दलचा तिरस्कार, करुणा, आदर, प्रेम इत्यादि भावना लेखकाच्या मनांत इतक्या उत्कट होतात कीं तें पात्र जिवंत होऊन त्याचेपुढे हलूं लागतें. त्याचें बोलणें, त्याचें रूप, त्याचा आवाज, त्याचें शरीर व त्याची चालचलणूक कवीला प्रत्यक्षवत् होते. तें पात्र कवीच्या मनाचा संपूर्ण ताबा घेतें· याचाच अर्थ तें कवीचें पात्र–संवेदन बनतें. हरिभाऊंचा शंकरमामाजी किंवा सावळ्या, श्रीहर्षाचा कलि, भारवीची द्रौपदी, फडक्यांच्या अनेक विलासप्रिय नायिका, गडकऱ्यांचा सुधाकर, सानेगुरुजींचा श्याम इत्यादि पात्रें पात्र–संवेदनेचीं उदाहरणें होत.

( ३ ) एकाद्या विचाराने किंवा विषयाने कविमनाचा कबजा घेतला, त्या विषयाचा त्याला सारखा ध्यास लागला, जागृतीं स्वप्नीं त्याला तो दिसूं लागला, किंवा त्याने कवीस सबाह्यअभ्यन्तर व्यापून टाकलें म्हणजे तें त्या कवीचें विषयसंवेदन किंवा विचारसंवेदन म्हणावयाचें. शेक्स्पिअरला वसंत ऋतूचें ( Spring ) असें संवेदन होतें. वसंतागमनानें तो पराकाष्ठेचा उल्हसित होई. या ऋतूंत वृक्षलतांना नव्या जीवनरसाचा पुरवठा होऊं लागला कीं आपल्याच नसांत त्याचें चैतन्य खेळूं लागल्याचा आनंद त्याला होई आणि वसंतागम हें मानव्याच्या नव्या अवताराचें प्रतीक त्याला वाटे. याचप्रमाणें पांडुरंग हें तुकारामाचें, स्वातंत्र्य हें शिवरामपंत परांजप्यांचें, समाजाबद्दलचें मातृवात्सल्य हें साने गुरुजींचें, आदर्श राजवैभव हें कालिदासाचें, निसर्गसौंदर्य हें बालकवींचें, प्रेमभंगाचें औदासीन्य हें गडकऱ्यांचें अशीं त्या त्या कवीचीं तीं तीं संवेदनें होऊन राहिलीं होतीं. एखाद्या वस्तूमुळें तीच भावना वरचेवर उद्दीपित होऊन त्या भावनेचा किंवा त्या भावाचा एक स्थिर संस्कार मनांत कायमचा राहिला कीं त्याला स्थायी भाव म्हणतात. तशांतलाच हा संवेदनेचा प्रकार दिसतो. फरक इतकाच कीं हे स्थायी भाव कवीचे असून ते आपल्या आलंबनविभावांसह येथे दृष्टीस पडतात.

शिवाय हे संवेदनरूप स्थायी भाव कवीचे असल्याने, व काव्यनिर्मितिकालीन असल्या-मुळे त्यावर अद्याप इतर मानसशक्तींचे संस्कार झालेले नसतात व त्याचें रूपान्तरहि व्हावयाचें असतें. संवेदनें हीं सर्वच प्रसंगीं आपल्या रूपांनीं कलाकृतींत प्रगट होत नाहींत. प्रत्यक्ष आपल्या मातेच्या मृत्यूचे संस्कार यशवंतांवर स्पष्टपणें उमटलेले होते ही गोष्ट खरी असली तरी त्या संस्कारांना किती निराळें व कलात्मक वळण त्यांनीं आपल्या 'आई' या कवितेंत दिलें आहे हें सर्वांस माहीतच आहे. खऱ्याखुऱ्या अनुभवाने निर्माण झालेले संस्कार वर सांगितल्याप्रमाणे व त्यांच्या बनलेल्या छोट्या मोठ्या घटना म्हणजेच वरील तीन प्रकारचीं संवेदनें—हीं कवीच्या मनांत काव्य निर्मितिकालीं सज्ज असलेली काव्यसामुग्री आहे. औचित्य, सौंदर्यदृष्टि व कलात्मकता या दृष्टींनी त्या संवेदनांना व्यक्तिनिरपेक्ष असें सार्वत्रिक अनुभवाचें अधिष्ठान कवीने दिलें कीं त्यांतूनच काव्य-रसायन निर्माण होतें.

---

"The majority of married couples never get to know one another at all: they only get accustomed to having the same house, the same children, and the same income which is quite a different matter. Very few couples can live in a single-room tenement without exchanging blows quite frequently."

—G. B. Shaw
( *Getting Married–Preface* )

# " सुश्लोक-मेघ "

लेखक— स. का. दीक्षित, एम्. ए.

प्राचीन भारतीय वाङ्मयांत जीं कांहीं अत्युच्च कोटीचीं मौलिक रत्नें आढळतात, त्यांत कालिदास-रचित मेघदूताची गणना प्रामुख्याने होते. यास वाग्देवतेच्या किरीटा-वरील कोहिनूरच मानावयास हरकत नाहीं. यापेक्षा अधिक मोठीं अशीं अनेक रत्नें त्या किरी-टावर झळकत असतील. कांहींची किंमत एकंदरींत यापेक्षाहि जास्तच असेल; पण याचें पाणी कांहीं निराळें आहे. या रत्नामुळेच यास 'एका सम्राज्ञीचा किरीट' असें सार्थ नांव प्राप्त झालें आहे, असें म्हणावयास हरकत नाहीं.

संस्कृत वाङ्मयांतील भगवद्गीतेच्या खालोखाल सर्वांत अधिक भाषान्तरें जर कोणत्या एका ग्रंथाचीं झालीं असतील, तर तीं मेघदूताचीं. अशा परिस्थितींत, "सुश्लोकमेघ" या डॉ. रा. चिं. श्रीखंडे यांच्या अभिनव कृतीने आणखी एका नवीन अनुवादाची भर पडली, इतकेंच—अशा कल्पनेने या अनुवादाची अनेक सामान्य वाचकांकडून कदाचित् उपेक्षा होईल, अशी शंका आल्यामुळे हें परीक्षण हातीं घेतलें आहे. हा ग्रंथ अथ-पासून इति-पर्यन्त वाचल्यावर, अनेक दृष्टींनी हा मराठी भाषेंत अद्वितीय आहे, अशी खात्री होते. मेघ-दूतासारख्या एका रसाळ व रमणीय संस्कृत काव्याचा, ओबडधोबड, किंबहुना 'खडकाळ' मराठी भाषेंत सुरस अनुवाद करावयाचा, तो देखील कोल्हापुरात वैद्यकीय पेशानें उपजीविका करणाऱ्या एका अल्पप्रसिद्ध गृहस्थानें —- ही कल्पनाच थोडीफार चमत्कारिक वाटेल. त्यांत, या ग्रंथाच्या "अवतरणिका" नांवाच्या प्रस्तावनेंत जी विद्वत्ता आढळते, तीमुळे या गृहस्थांच्या परिश्रमांविषयीं आश्चर्य व आदर वाटल्याशिवाय राहत नाहीं. कालिदासादि कवींची मनो-भावाने सेवा केल्यामुळे म्हणा, किंवा कवितादेवीच्या सांनिध्यांत सतत राहिल्यामुळे म्हणा, मेघदूतांतील श्रुतिरम्य काव्यसंगीत व त्याची रमणीय छाया या 'सुश्लोक मेघां'त सर्वत्र आढळतात.

सुंदर काव्य रचणें, ही एक नैसर्गिक शक्ति किंवा प्रतिभा आहे; किंवा डॉक्टर महा-शयांना कवितादेवीची नाडी बरोबर सांपडली ती दैवशात्, असा या अनुवादांत आढळणाऱ्या कवित्वाचा आपणांस गुळमुळीत गौरव करतां येईल. पण त्यांत पुरेसा प्रामाणिकपणा अस-णार नाहीं. अनुवाद करतांना प्रत्येक श्लोकागणिक किती परिश्रम पडले असतील, किती व्यवधानें ठेवावीं लागलीं असतील याची कल्पना—जावें त्याच्या वंशा तेव्हा कळे. ज्याने एखाद्या संस्कृत श्लोकाचें मराठींत भाषांतर करण्याचा प्रयत्न केला आहे, त्यालाच ती येईल.

मेघदूतासारख्या प्राचीन ग्रंथाचें भाषान्तर करीत असतांना सर्वांत प्रथम ही गोष्ट लक्षांत ठेविली पाहिजे कीं, भाषान्तर करावयाच्या मूळ ग्रंथाचा पाठ बरोबर असला पाहिजे. अनुवाद चांगला असेल, पण मूळ पाठ चुकीचा असेल, तर त्या अनुवादाची काचेला घातलेल्या कोंदणा-सारखी अवस्था होईल. डॉ. श्रीखंडे यांनी स्वीकारलेल्या पाठभेदांशीं तुलना केली असतां, असें आढळून येतें की, डॉक्टरमहाशयांचे पाठ हे बहुतेक प्रसंगीं अधिक योग्य व ग्राह्य वाटतात.

अनुक्रमणिका

| श्लोक | डॉ. रा. चिं. श्री. | प्रा. आर. डी. क. |
| --- | --- | --- |
| १ | स्वाधिकारात्प्र० | स्वाधिकारप्र० |
| ६ | याच्ञा मोघा | याच्ञा वन्ध्या |
| ८ | आश्वसन्त्यः | आश्वसत्यः |
| १२ | मवति भवतो | भवति भवता |
| १३ | श्रोत्रपेयम् । | श्राव्यबन्धम् |
| १५ | रत्नच्छायाव्य० | रत्नच्छायव्य |
| १७ | प्रशमितवनो० | प्रशमितदवो० |
| २१ | जम्बवारण्ये० | दग्धारण्ये० |
| २४ | फलमविकलं | फलमपि महत् |
| ,, | स्वादु यस्मात् | स्वादु यत्र |
| ,, | चलोर्मि ॥ | चलोर्म्याः ॥ |
| ३५ | पादन्यासैः क्व० | पादन्यासक्व० |
| ३७ | मा स्म भूः | मा च मूः |
| ३९ | कमलनयनात् | कमलवदनात् |
| ५० | गौरीवक्त्रभ्रु० | गौरीं वक्त्रे भ्रु० |
| ५४ | परिभवपदं | परिभवफला |
| ५७ | नियमनाभ्यु० | नियमनेऽभ्यु० |
| ५९ | शोभामद्रेः | लीलामद्रेः |
| ६० | हित्वा तस्मिन् | तस्मिन् हित्वा |
| ,, | विचरेत् | विहरेत् |
| ६२ | ०मैरावतस्य | ०मैरावणस्य |
| ,, | ०न्यंशुकानीववातैः | ०न्यंशुकानि स्ववातैः |
| ६४ | स्निग्धगम्भीर० | स्निग्धपर्जन्य० |
| ७१ | नवजलकणैः | खजलकणिका० |
| ,, | जालमार्गैः (or यत्र जालैः ?) | यन्त्रजालैः |
| ७२ | प्रियतमभुजालिङ्गनोच्छ्वासितानां | प्रियतमभुजोच्छ्वासितालिङ्गितानां |
| ७३ | मूपणानां विकल्पान् | भूपणानां विकल्पम् |
| ७७ | गृहानुत्तरेणा० | गृहादुत्तरेणा० |
| ,, | सुरपतिधनु० | त्वदमरधनु० |
| ७८ | ०प्रेक्ष्य हंसाः । | प्राप्य हंसाः । |
| ७९ | रचिताशिखरः | विहिताशिखरः |
| ८५ | गाढोत्कण्ठां... बालां जातां... ०मथितां पद्मिनीं वान्यरूपाम् । | गाढोत्कण्ठा... बाला जाता... ०मथिता पद्मिनी वान्यरूपा । |
| ८६ | त्वदनुसरण० | त्वदुपसरण० |
| ८७ | मधुरवचनां | मधुरवचनं |
| ८८ | स्वयमपि कृतां | स्वयमधिकृतां |
| ८९ | देहलीदत्तपुष्पैः | देहलीमुक्तपुष्पैः |
| ,, | मत्संगं वा हृदयनिहितारम्भ० | संयोगं वा हृदयरचितारम्भ० |
| ९१ | क्षण इव | क्षणमिव |
| ९२ | चक्षुः खेदात् | खेदाच्चक्षुः |
| ९६ | पेशलं धार० | पेलवं धार० |
| १०० | तामुत्थाप्य | प्रोत्थाप्यैनां |
| ,, | स्तनितवचनैः | स्तनितवचनो |
| १०३ | ०त्वां वियुक्तः | ०त्वां नियुक्तः |
| १०४ | प्रतनु तनुना | तनु च तनुना |
| ,, | सास्रेणाश्रु० | सास्रेणास्र० |
| १०६ | ०हरिणीप्रेक्षणे | ०हरिणीप्रेक्षिते |
| ११२ | शेषान्मासान् | मासानन्यान् |
| ,, | विरहगुणितं | विरहगणितं |
| ११३ | त्वमपि शयने | त्वमसि शयने |
| ११४ | विरहे ध्वंसिनस्ते त्वमोगाद् | विरहे ह्रासिनस्तै ह्यभोगाद् |
| ११५ | प्रथमविरहोदग्रशोकां | प्रथमविरहे शोकदग्धां |
| ११६ | शैलादाशु त्रिनयनवृषो० | तस्मादद्रेस्त्रिनयनवृषो० |
| ११७ | *प्रियमनुचितप्रार्थनावर्तिनो मे | प्रियमनुचितं प्रार्थनादात्मनो मे |

* श्लोकांचे आंकडे सर्वत्र रा. चिं. श्रीखंडे यांच्या प्रतीप्रमाणे दिलेले आहेत.

या उलट, प्रा. आर. डी. करमरकरांनीं मान्य केलेले खालील पाठभेद, डॉ. श्रीखंडे यांच्या पाठभेदांपेक्षा अधिक सरस व ग्राह्य वाटतात.

| प्रा. आर. डी. क. | डॉ. रा. चिं. श्री. | प्रा. आर. डी. क. | डॉ. रा. चिं. श्री. |
|---|---|---|---|
| ४ प्रत्यासन्ने नभसि | प्रत्यासन्ने मनसि | ६८ ०कुसुमरचनान्यु० | ०कुसुमरचितान्यु |
| ,, कुटजकुसुमैः | उटजकुसुमैः | | |
| २६ वननदीतीरजानां निषिञ्चन् | वननदीतीर—जातानि सिञ्चन् | ७७ यस्योद्याने | यस्योपान्ते |
| | | ७८ हैमैः स्फीता | हैमैश्छन्ना |
| ३० पूर्वोद्दिष्टामुपसर | पूर्वोद्दिष्टामनुसर | ,, दीर्घवैदूर्यनालैः | स्निग्धवैदूर्यनालैः |
| ३६ नृत्तारम्भे | नृत्यारम्भे | ,, नाश्यास्यन्ति | नाश्यास्यन्ते |
| ४९ बन्धुस्नेहात् | बन्धुप्रीत्या | ८० दौहृदच्छद्मना | दोहदच्छद्मना |
| ५५ उपहृतबलिं | उपाचितबलिं | ८६ बहूनां निःश्वा० | प्रियायाः निःश्वा० |
| ,, कल्पिष्यन्ते | संकल्पन्ते | ८८ तन्त्रीरार्द्राः | तन्त्रीमार्द्रां |
| ५६ संरक्ताभिः | संसक्ताभिः | ९० विप्रयोगः | मद्वियोगः |
| ,, समस्तः | समग्रः | ,, सुखयितुमतः | सुखयितुमलं |
| ६१ मोक्षो यदि तव सखे | मोक्षस्तव यदि सखे | १०० धीरस्तनित० | धीरः स्तनित० |
| | | १०२ संभाव्य चैव। | संभाव्य चैवम्। |
| ६१ भीषयेस्ताः ॥ | भाययेस्ताः ॥ | ११२ तं तमेवाभिलाषं | तं तमात्माभिलाषं |
| ६५ आननश्रीः | आनने श्रीः | | |

येथे हें स्पष्ट केलें पाहिजे कीं वरील पाठांची ग्राह्याग्राह्यता मीं केवळ काव्याच्या, रासिकतेच्या दृष्टीने ठरविली आहे; प्राचीन हस्तलिखित प्रतींच्या किंवा प्राचीन टीकाकारांच्या आधाराने ठरविलेली नाही. वस्तुतः शास्त्रीय दृष्ट्या ही या दुसऱ्या मार्गानेच ठरविणें कदाचित् योग्य होईल. पण मी मेघदूताकडे काव्य या दृष्टीने पाहतों, एक पुरातन अवशेष म्हणून नव्हे. वरील ग्राह्यग्राह्यांविषयींचा निर्णय घेतांना, ( १ ) प्रसाद किंवा अर्थव्यक्ति ( २ ) पूर्वापरसंबंध, संदर्भ किंवा औचित्य ( Context ), ( ३ ) शब्दसौष्ठव किंवा नादमाधुर्य, या गुणांवरच आम्ही अधिक भिस्त ठेविली आहे. यांपैकीं या शेवटच्या गुणविशेषाविषयीं व्हावी तितकी चर्चा आजवर झालेली नाहीं. डॉ. श्रीखंडे यांनी मात्र या गुणविशेषाचें "वापी चास्मिन्" या अलकेंतील दिव्य विहिरीच्या वर्णनाच्या साहाय्याने फार मार्मिक विवेचन केलें आहे. "अकृत्रिम कौशल्याने झालेली शब्दांची गुंफण" हें एक कालिदासीय शब्दसृष्टीचें रमणीय वैशिष्ट्य आहे हें त्यांनी दाखवून दिलें आहे. या (७८ व्या) श्लोकांतील दुसरी ओळ डॉ. श्रीखंडे यांच्या मतें "हैमैश्छन्ना० स्निग्धवैदूर्यनालैः" अशी आहे. पण यापेक्षां प्रा. करमरकरांनी दिलेला "हैमैः स्फीता० दीर्घवैदूर्यनालैः" हा पाठ अधिक ग्राह्य आहे. असें मीं वर निर्दिष्ट केलें आहे. आश्चर्य हें कीं, आपल्या "अवतरणिका" नांवाच्या प्रस्तावनेंत ( पृ. ३४ ) स्वतःचा पाठ उद्धृत करून, त्यावर टीका करतांना मात्र "दीर्घवैदूर्य" या शब्दांतील समानवर्णता दाखवून हा दुसरा पाठ अधिक ग्राह्य असल्याची डॉक्टरांनी कबुली दिली आहे.

डॉ. श्रीखंडे यांनी सामान्यतः मल्लिनाथाचे पाठभेद स्वीकारले आहेत. तसेंच प्रा. आर. डी. करमरकर यांनीहि सामान्यतः जिनसेनाच्या पार्श्वाभ्युदयांतील पाठभेद उद्धृत केले आहेत. या बाबतींत प्राध्यापक महाशयांनी प्रा. के. बी. पाठक यांचाच मार्ग अनुसरला आहे. केवळ काव्याच्या, रसिकतेच्या दृष्टीने अधिक ग्राह्य वाटणाऱ्या पाठभेदांपैकीं सुमारे $\frac{२}{३}$ मल्लिनाथानेहि स्वीकारले आहेत. बाकीच्या $\frac{१}{३}$ पाठभेदांच्या बाबतींत मल्लिनाथाचा व माझा मतभेद झाला आहे. मल्लिनाथाला अमान्य असलेले किंवा माहीत नसलेले पाठ मला अधिक ग्राह्य वाटले आहेत.

या शब्दविषयक पाठभेदांखेरीज मेघदूताच्या निरनिराळ्या आवृत्तींत, त्यांतील श्लोकांच्या अनुक्रमाविषयींहि अनेक पाठभेद प्रचलित असल्याचें आढळतें. या दुसऱ्या प्रकारच्या पाठभेदामुळे मेघदूत वाचतांना रसिक मनाला अनेक ठिकाणीं खटकल्यासारखें वाटतें, कुठें तरी कांही तरी खुपल्यासारखें होतें. केवळ रसाच्याच दृष्टीने विचार करतां असें आढळून येतें कीं, डॉ. श्रीखंडे यांनी स्वीकारलेला श्लोकानुक्रम योग्य व रसानुसारी आहे. 'मंदं मंदं,' 'कर्तुं यच्च,' व 'तां चावश्यं' (श्लो. ९ ते ११) यांचा हा क्रम कोणत्याहि प्राचीन टीकाकाराला संमत नाहीं. परंतु बहुतेक साऱ्या टीकाकारांना मान्य असलेला 'मंदं मंदं' 'तां चावश्यं' व 'कर्तुं यच्च' हा अनुक्रम रसहानिकारक वाटतो. हा अनुक्रम प्रा. करमरकरांनीं अनुसरलेला आहे, हें शास्त्रीय दृष्ट्या योग्यच आहे. डॉ. श्रीखंडे यांचें येथे काव्याच्या दृष्टीनेच लक्ष्य दिसतें. 'हस्ते लीला०', 'यत्रोन्मत्त०' व 'आनन्दोत्थं' (श्लो. ६५ ते ६७) या श्लोकत्रयींत 'यत्र' या शब्दामुळें जें साधर्म्य आलें आहे त्यावरून हे तीन्ही श्लोक एकत्र असले पाहिजेत, हें उघड आहे. हाच श्लोकानुक्रम मल्लिनाथाला मान्य आहे. पार्श्वाभ्युदयात देखील हे श्लोक उलट्या अनुक्रमानें एकत्र आढळतात. येथें प्रा. करमरकर यांनी स्वीकारलेल्या अनुक्रमास मात्र, प्राचीन टीकाकारांच्या किंवा रसिकतेचा कसलाच आधार नाहीं. 'आधिक्षामां', 'पादानिन्दोः', 'निःश्वासेना०' व 'आद्ये बद्धां' (श्लोक ९१--९४) हा डॉ. श्रीखंडे यांनी स्वीकारलेला अनुक्रम औचित्यपूर्ण व रसानुसारी आहे. इतकेंच नव्हे, तर मल्लिनाथालाहि तो मान्य आहे. येथें प्रा. करमरकरांनी पार्श्वाभ्युदयांतील अनुक्रम स्वीकारला आहे. परंतु या चार श्लोकांत आढळणारीं चार सुंदर दृश्यें या अनुक्रमामुळे कांहींशीं विस्कळित झाल्याचा भास होतो. चलचित्रपट दाखवितांना रीलसचे नंबर्स चुकून एकादा भाग इकडचा तिकडे गेला म्हणजे जशी प्रेक्षकाची अवस्था होते तशीच पार्श्वाभ्युदयांतील या अनुक्रमामुळें रसिक वाचकाची होते. काव्याच्या दृष्टीने यांतील रसभंगाची जाणीव झाल्यामुळेंच कदाचित् मल्लिनाथाने निराळा अनुक्रम स्वीकारला असेल. कदाचित् त्याला याबाबतींत प्राचीनतर हस्तलिखितांचा पुरेसा पाठिंबाहि नसेल ! कुणी सांगावें ? पण हा सारा तर्क झाला. आज आपल्यापुढे या प्राचीन टीकाकारांपैकीं अधिक ग्राह्य अनुक्रम कोणाचा एवढाच प्रश्न आहे.

मात्र 'प्रद्योतस्य प्रियदुहितरं' व 'हारांस्तारांस्तरल' या दोन सुंदर श्लोकांना डॉ. श्रीखंडे यांनी आपल्या आवृत्तींत स्थान दिलें नाहीं, हें पाहून कालिदासकालीन इतिहासाच्या अभ्यासकाचें मन हळहळल्याशिवाय राहत नाहीं. हे दोन्ही श्लोक प्रक्षिप्त नसून, कालिदासकृतच आहेत. याविषयीं पुरेसा वाङ्मयीन पुरावा उपलब्ध आहे. पण स्थलाभावास्तव मी तो येथें सादर करीत नाहीं. दुसऱ्या आवृत्तींत डॉक्टरमहाशयांनी एवढी सुधारणा अवश्य करावी, अशी माझी त्यांना आग्रहाची विनंती आहे.

मूळ ग्रंथांतील पाठभेदांची शुद्धाशुद्धता ठरविल्यावर, त्यांतील प्रत्येक श्लोकाचा समग्र अर्थ मराठींत कोणत्या वृत्तांत स्पष्टपणें व नीटपणें उतरूं शकेल, त्याकरतां सामान्यतः अधिक शब्दविस्ताराची जरुरी पडणार नाही, याचा अनुवादकर्त्यांनें प्रारम्भींच पुरेसा विचार करावयास हवा. तो तसा न केल्यामुळे, श्री. भा. शं. देवस्थळी, श्री. गं. गो. दामले, श्री. बा. लं. अंतरकर, श्री. शां. आ. सबनीस, सध्याचे अर्थमन्त्री सर चिं. द्वा. देशमुख, इत्यादि अनुवादकांच्या कृतींत अनेक वैगुण्यें आढळून येतात. या साऱ्या कवींचा मेघदूताचा समवृत्त व समश्लोकी अनुवाद करण्याविषयींचा अट्टाहास पाहिला म्हणजे कालिदासाशीं सर्वथैव स्पर्धा करण्याची तर यांची भूमिका नाहीं ना, असा संशय आल्याशिवाय राहत नाही. अनुवाद हा मूळ कृतीशीं स्पर्धा करण्याच्या ईर्ष्येने करावयाला हरकत नाही; पण त्याबरोबर मूळ भाषेचें वैशिष्ट्य व अनुवादाच्या भाषेच्या मर्यादा यांसारख्या गोष्टीहि लक्षांत ठेविल्या पाहिजेत. प्रा. ल. ग. लेले यांचा मेघदूताचा अनुवाद समवृत्त असला, तरी तो समश्लोकी नाही. त्यामुळे कित्येक ठिकाणीं साऱ्या समवृत्त अनुवादांत तो किती बहारीचा झाला आहे ! डॉ. श्रीखंडे यांनीहि कालिदासीय कृतींशीं स्पर्धा न करण्याविषयींची आपली भूमिका स्पष्ट केली आहे (पृ. ९–१०) व तिला अनुसरूनच त्यांनी असें एक तत्त्व मांडलें आहे कीं, "अनुवादकाचें ज्या वृत्तावर प्रभुत्व असेल, त्यांतच त्याने अनुवाद करण्याचा प्रयत्न करावा." (पृ. ४१). अन्यत्र (पृ. ८७) त्यांनी असें म्हटलें आहे कीं, "सुश्लोकमेघाच्या रचनेस, समग्र मूळ अर्थ उत्तम तऱ्हेने यावा हा हेतु साधण्यासाठी उपजाति हेंच स्वीकारावें, असें विचाराअन्तींच मीं निश्चित केलें. एका कालिदासीय मंदाक्रान्तेचा एका मराठी मंदाक्रांतेंत सामर्थ्यानें प्रसादगुणयुक्त अर्थ आणणें जवळ जवळ अशक्यच आहे." हें उपजाति वृत्त या अनुवादांत कित्येक ठिकाणीं इतक्या सफाईनें वापरलें आहे कीं, वाचताना कालिदासीय काव्याची आठवण व्हावी; कारण, रघुवंशादि काव्यांत कालिदासानें हें वृत्त वारंवार योजिलें आहे. या दृष्टीने अनुवादकर्त्यांने नकळत कालिदासाशीं थोडीफार रम्य स्पर्धा केली आहे. 'विद्युद्वन्तं' यासारख्या अनुवादाच्या दृष्टीने अवघड असलेल्या श्लोकाचा खालील अनुवाद कसा नितांतरमणीय झाला आहे हें पाहण्यासारखें आहे.

तुझ्यामधें शोभति चंचला या
प्रासादिं तीच्या किति सुंदरांगी !
तूं इन्द्रचापें सजसी, तसे ते
मनोज्ञ चित्रीं सजती सुरंगी ॥१३४॥
गंभीर तुझे श्रुति–रम्य घोष,
संगीत त्यांच्यांत मृदंग–युक्त ।
तुझ्यामधें निर्मल तोय, तैसें
त्यांच्यांत भूमीतल रत्न-कान्त ॥१३५॥
उत्तुंग तूं हा, शिखरें तयांचीं
घना ! नभा स्पर्श करीति उंच ।
प्रासाद ऐसे अलकापुरीचे
त्या त्या विशेषीं तुजसेच साच ॥१३६॥

२

या उलट, याच श्लोकाचें अर्थमंत्री सर चिंतामणराव देशमुख यांच्या सारख्या विद्वान व प्रतिभावान् कवीनें केलेला एक-श्लोकी सम-वृत्त अनुवाद पहा*:—

जेथें सद्मे त्वदुपम पहा होत नाना प्रकारीं
चित्रें इन्द्रायुधसम, विजेसारख्या रम्य नारी !
संगीताचा घुमत तुजसा मन्द्रनादें मृदङ्ग ।
तूं नीरात्मा, मणितल तयां, तूं नि ते अभ्रतुंग ॥

येथें शब्दांची आणि अर्थांची किती खेचाखेच झाली आहे पाहा ! असाच दुसरा एक अवघड श्लोक, "आराध्यैनं शरवणभवं" ( श्लो. ४५ ) याचा श्रीखंडे-कृत रम्य अनुवाद पाहा :—

आराधुनी त्या भगवान् कुमारा
उल्लंघ त्या नंतर पंथ कांहीं ।
त्वन्मार्गे वीणाधर सिद्ध – युग्में
तुषार – भीत त्यजितील, पाही ॥९४॥
असङ्ख्य गो – यज्ञ करोनि, केली
निर्माण जी भूवरि रन्तिदेवें ।
सरित्स्वरूपें जणुं आत्म – कीर्ति,
त्वां आदराया निज आश्रयावें ॥९५॥

अशीं अनेक सुंदर स्थळें या अनुवादांत दाखवितां येण्यासारखीं आहेत. उदा० — २, ५, ११, १४, २७, २९, ३७, ३८, ४१, ४६, ५२, इ. श्लोक पाहा. यांच्यामुळे मराठी भाषेतील काव्यमय अनुवादांत "सुश्लोक–मेघा" चा क्रमांक बराच वरचा लागेल, यांत शंका नाही.

तथापि, क्वचित् प्रसंगीं डॉक्टरमहाशयांचा अनुवाद चुकीचा आहे, किंवा त्यांत भावार्थ नीट उतरला नाही, हें दाखवून देणें आवश्यक आहे. "रत्नच्छायाव्यतिकर इव" ( श्लो. १५ ) याचा डॉ. श्रीखंडे यांनी "संमिश्र तेजासम जें हिऱ्याच्या" असा अनुवाद केला आहे; त्या ऐवजीं तो त्यांनीं "समूह रत्नांतिल कांतिचा कीं," किंवा "नाना मण्यांचा जणु कांति–पुंज" असा केला असता तर तें मुळास अधिक धरून झालें असतें. रत्नांत हिऱ्यांखेरीज इतर रत्नांचाहि अन्तर्भाव होतो; व येथे इन्द्रधनुष्यांतील नाना वर्णांचा उल्लेख आहे, तो भाषांतरांत उतरला नाही.

सद्यः सीरोत्कषणसुरभिक्षेत्रमारुह्य मालं
किंचित्पश्चाद्व्रज लघुगतिर्भूय एवोत्तरेण ।

यांतील 'माळ' हें एका पठाराचें नांव दिसतें; व 'पश्चात्' या शब्दाचे (१) पश्चिमेस, पश्चिमेकडे व (२) परत, पाठीमागे, मागे, असे दोन अर्थ आहेत. या (१५व्या) श्लोकाच्या नंतरच्या श्लोकांत आम्रकूट पर्वताचा उल्लेख आहे. तो रामगिरि ( रामटेक ) च्या ईशान्य दिशेकडील

* अनुवादाचें एक तत्त्व विशद करण्याकरतां सर सी. डी. देशमुखांच्या "केवळ खाजगी प्रसारार्थ" छापलेल्या मेघदूताच्या अनुवादाचा येथे सार्वजनिक उपयोग केला आहे; याबद्दल सरसाहेब राग मानणार नाहीत, अशी आशा आहे.

अमरकंटक असेल, तर पश्चात् याचा दुसरा अर्थ घेणेंच येथे बरोबर होईल. पण अमरकंटक पर्वताला 'आम्रकूट' असें पूर्वीच्या काळीं एक नांव होतें, या तर्काला पुराणांत कोठेच आधार सांपडत नाहीं. उलट मत्स्य, स्कंद, इ. पुराणांत 'अमरकण्टक' असेंच नांव आढळतें. म्हणून डॉ. श्रीखंडे यांनी केलेला खालील अनुवाद मला अयोग्य वाटतो.

क्षेत्रांमधें नूतन नांगरील्या
सुगंधि माळावरती चढून ।
जाऊनि मार्गें लव, तूं त्वरेनें
करी पुनः उत्तर – दिक् – प्रयाण

या ऐवजीं आम्ही खालील अनुवाद सुचवितों–

शेतें जिथें नूतन नांगरीलीं
सुगंधि माळावरि त्या चढूनी ।
जाशील थोडा जरि पश्चिमेला
त्वरा करी उत्तर–दिक्–प्रयाणीं ॥

जग्ध्वारण्येष्वधिकसुरभिं गन्धमाघ्राय चोर्व्याः
सारङ्गास्ते जललवमुचः सूचयिष्यन्ति मार्गम् ।

या श्लोकाचा डॉ. श्रीखंडे यांनी मल्लिनाथाच्या आधाराने, दक्षिणावर्तनाथाचे आक्षेप न जुमानतां, 'सारंग' या शब्दाचे तीन अर्थ मान्य करून, खालील अनुवाद केला आहे.

... ... ... ... गिळून ॥
वनांतरींच्या क्षितिच्या सुगंधा
आस्वादुनी त्वत्पथ ये कळोनी ।
भृंगा, कुरंगा, वनिच्या मतंगा,
परोक्ष गेलासि जरी गळोनी ॥

दक्षिणावर्तनाथानें हें दाखवून दिलें आहे कीं, 'सारंग' या शब्दाचा 'मतंगज' या अर्थी वाङ्मयांत कोठेच उपयोग झालेला नाहीं. एकच शब्द असा एकच ठिकाणी एकदम तीन अर्थी वापरण्याचा विक्षिप्तपणा कालिदास करील, हें संभवत नाहीं. या तीन निरनिराळ्या प्रकारच्या 'सारंगां'नी या कवितेंतल्या साऱ्या क्रिया केल्या, कां एकेकानें एकेक केली ? पहिल्या गोष्टींत काव्य नाहीं, व दुसरीला आधार नाहीं. या साऱ्या क्रिया एकाच प्रकारच्या कुरंगांनी–हरिणांनी केल्या; वनश्रीचें नवोदित ऐश्वर्य उपभोगणाऱ्या, त्याच्या पाठोपाठ पळणाऱ्या हरिणांचें एक सुंदर दृश्य येथें कालिदासानें रेखाटलें आहे, असें मला वाटतें. त्याला अनुसरून मी खालील अनुवाद सुचवितों—

... ... ... ... गिळून ॥
तोयें तुझ्या उद्गत तो वनाचा
सुगंध घेत्या पळुनी कुरंग ।
तुषार ते सिंचित आक्रमीसी,
असा तुझा दाखवितील मार्ग ॥

हा अनुवाद मुळास अधिक धरून होईल. " संपत्स्यन्ते कतिपयदिनस्थायिहंसा दशार्णाः । " या पंक्तीचा अर्थ मात्र डॉक्टरमहाशयांनी मुळांतील अर्थाच्या अगदी उलट केलेला दिसतो.

अनुक्रमणिका

तैसेंचि कांहीं दिन हंस तेथें
रहावयालाहि विलोभतील ।

तुला पाहिल्याबरोबर ( त्वय्यासन्ने ) हंस मानस-सरोवराकडे जावयास उत्सुक होतील, व दशार्ण-देशांत ते फारच थोडे दिवस राहतील, असें कवीला सुचवावयाचें आहे. या पंक्तीचा सर चिं. द्वा. देशमूख यांनीं केलेला अनुवाद भावार्थाच्या दृष्टीनें मुळास अधिक धरून आहे.

त्वत्सान्निध्यें गमनसमया जाणिती राजहंस ।

या बाबतींत ( श्लो. ७८ ) "नाभ्यास्यन्ति व्यपगतशुचस्त्वामपि प्रेक्ष्य हंसाः" यांतील कल्पना लक्षांत घ्यावी.

नन्वात्मानं बहु विगणयन्नात्मनैवावलम्बे
तत्कल्याणि त्वमपि नितरां मा गमः कातरत्वम् ।

या श्लोकाच्या ( श्लो. १११ ) डॉ. श्रीखंडे यांनी केलेल्या खालील अनुवादांत मुळांतला अर्थ पुरेसा उतरलेला नाही.

मनोरथांनीच असें स्वतांला
आधार मी यापरि देत राहे ।
म्हणूनि तूंहि सुभगे ! न भीती
मनामधें फारशि भीरु ! वाहें ॥

यापेक्षा खालील अनुवाद मूळ अर्थास अधिक धरून होईल.

स्वतःस मानून अति, स्वतःला
आधार मी यापरि देत राही ।
म्हणूनि तूंही सुभगे ! जरूर
धरून धीर स्थिर-चित्त राही ॥

कच्चित्सौम्य व्यवसितमिदं बन्धुकृत्यं त्वया मे
प्रत्यादेशान्न खलु भवतो धीरतां कल्पयामि ।

यांतील 'प्रत्यादेशः' या शब्दाचा अर्थ येथे नेहमींप्रमाणें 'निराकृतिः' ( धिःकार, उपमर्द ) असा नसून 'प्रतिवचन' ( उत्तर, जबाब ) असा आहे, ही गोष्ट मल्लिनाथानें स्पष्ट केली असतांना सुद्धा त्याकडे प्रा. के. बी. पाठक, प्रा. आर. डी. करमरकर, सर चिं. द्वा. देशमूख, डॉ. श्रीखंडे, इ. विद्वान् अनुवादकांपैकीं कुणीहि लक्ष दिलेलें नाही. त्यांनी या शब्दाचा येथें नेहमींचा अर्थ गृहीत धरून श्लोकाच्या अर्थाचा अनर्थ केला आहे.

डॉ. श्रीखंडे यांचा अनुवाद असा आहे.

साधो ! तुझा निश्चय जाहला कीं ?
करावया या मम बन्धुकार्या ।
खरोंचि, ना मौन तुझें गणीं मी,
कीं तूं दिला साच नकार, आर्या ! ॥

यापेक्षा खालील अनुवाद भावार्थास अधिक अनुसरून होईल—

साधो ! तुझा निश्चय जाहला ना
करावया या मम बन्धु- कार्या ?

दिलेंचि तूं उत्तर पाहिजे, हा
माझा नसे आग्रह, जाण, आर्या !

मूळ काव्याच्या भाषेची गोडी अनुवादाच्या भाषेंतच नाहीं; तथापि मूळांतील उदात्त कल्पनांना व भावार्थाला अनुरूप अशी प्रौढता आपल्या अनुवादांत आणण्याचा प्रयत्न डॉ. श्रीखंडे यांनी यशस्वी रीतीनें केला आहे, यांत शंका नाही. क्वचित् प्रसंगीं 'दुसण्या' सारख्या एखाद्या गद्य-प्राय (Prosaic) शब्दामुळें थोडेंसें विसंवादित्व उत्पन्न झालें असेल. (श्लोक २ पाहा.). पण एकंदरींत भाषा शिष्ट व प्रौढ अशीच आहे. प्रौढतेच्या पाठीमागे लागून भाषा क्लिष्ट होऊं देतां कामा नये. 'प्रसाद' हा कोणत्याहि काव्यांतील एक अनमोल गुण आहे. असल्या उच्च काव्याचा रसानुसारी अनुवाद करतांना, संस्कृत-प्रचुर प्रौढ भाषेचा उपयोग होणें, साहजिक व जरूर आहे. पण ती भाषा संस्कृत-प्राय असतां कामा नये; ती 'मराठी' नसून संस्कृत आहे, असें वाचकांस वाटतां कामा नये. सामान्यतः हे सारे नियम डॉ. श्रीखंडे यांनी चोख रीतीने पाळले आहेत. त्यांतल्या त्यांत उत्तर-मेघाचे भाषान्तर अनेक ठिकाणीं फार बहारीचें झालें आहे. तरी कांहीं ठिकाणीं भाषा संस्कृत-प्राय झाली आहे. येथें आपण संस्कृत तर वाचत नाही ना, असा भास होतो. "श्रोत्रमनोभिराम" (श्लो. १३), "मनोज्ञ स्खलिता" (श्लो. २८), "शीर्पेन्दुभा" (श्लो. ७), "तच्छफरी" (श्लो. ४०), "बालेन्दुधर्त्या" (यापेक्षा 'बालेन्दुधारी' हें अधिक उचित होईल.) (श्लो. ४३), "तीक्ष्ण शराभिवृष्टि" (श्लो. ४८), "देवदारुद्रुमपल्लवांच्या" (श्लो. १०९), "मच्छापहि" (श्लो. ११२) असे शब्द-प्रयोग बरेच ठिकाणीं आढळतात. त्यांत पुढील आवृत्तींत शक्य ती सुधारणा होणें इष्ट आहे. वर उल्लेखिलेले,—गद्यप्रायत्व व संस्कृतमयत्व असे—दोन्ही दोष एकाच श्लोकांत आढळले, म्हणजे मात्र रसिक मनाचा हिरमोड झाल्यासारखें होतें. उदा. श्लोक ५० पहा:—

उमेचिया भ्रूकुटि मोडण्याला
जी हांसुनी फेन-मिषेंच जैसें ।
स्वत्रीचि—हस्तें शशि—शोभि—केशां
श्रीशंभूच्या कर्पितसेचि भासे ॥

या ठिकाणीं मी खालील अनुवाद सुचवितों—

उमेचिया त्या भ्रकुटी—विलासा
जी हासते फेनमिषेंचि तैसें ।
तरंग—हस्तें जणु शंभु-केशा
चन्द्रासवें कर्षितसेचि भासे ॥

श्लो. १९ च्या अनुवादांत, "कीं कुंजरांगावरि रंगवीली" यासारख्या मराठी भाषेला अपरिचित अशा शब्दप्रयोगाऐवजीं "अंगावरी रंगविली गजाच्या" असें सुटसुटीत शब्द वापरले असतां अधिक योग्य ठरेल. तसेंच

बाजूवरी आम्रतरू वनींचे
फलीं सुपक्कीं दिसतात पीत ।
तूं स्निग्ध केशासम कृष्ण-कान्ति
त्या आद्रि-सानूवरि रूढ होत ॥

या ऐवजीं, श्लो. १८ चा खालील अनुवाद सामान्य वाचकाच्या दृष्टीनें स्पष्ट किंवा अर्थबोधक ठरेल—

वाजूवरी आम्रतरू वनींचे
ते पीत झाले पिकल्या फळांनीं।
अशा गिरीच्या शिखरावरी कीं
तूं स्निग्धवेणीसम जा चढूनी॥

वर निर्दिष्ट केलेल्या दोषांखेरीज आणखी एक महत्त्वाचा दोष या अनुवादांत क्वचित् दृष्टीस पडतो. तो म्हणचे पुनरुक्ति. श्लो. १ मध्यें व श्लो. १४ मध्यें अशा दोषांचीं उदाहरणें सांपडतील.

पुण्योदकें तेथिल जानकीची
पूर्वीं तिथें नाहलि जानकी कीं। (श्लो. १)
स्यानाहुनी या निचुलाख्य वेत
रसाळ जी शोभवितात जागा। (श्लो. १४)

हे सारे व इतर कांही दोष किंवा वैगुण्यें दृष्टिआड केलीं असतां, कालिदासाच्या मेघदूताला सर्वथा अनुरूप असाच हा अनुवाद झाला आहे, असेंच कोणीहि रसिक म्हणेल.

डॉक्टर महाशयांनीं "अवतरणिका" म्हणून एक विद्वत्ताप्रचुर प्रस्तावना या अनुवादास लिहिली आहे, याचा उल्लेख वर केलाच आहे. तिच्यांतील, केवळ वैयक्तिक महत्त्वाचा, आत्मचरित्रविषयक, किंवा मित्रबांधवांनी त्यांच्या केलेल्या गौरवाविषयींचा कांहीं भाग त्यांनी गाळला असता, तर या प्रस्तावनेची किंमत अधिक वाढली असती. आजपर्यंत मेघदूताचे मराठी भाषेंत जे जे अनुवाद झाले त्यांचे गुणविशेष निर्दिष्ट करून, अनुवादाचीं तत्त्वें त्यांनी विशद केलीं आहेत. मेघदूत व वाल्मीकिरामायण यांतील किती तरी साम्यस्थळें विद्वानांच्या नजरेला आणून, व भागवत, योगवासिष्ठ. इ. ग्रंथांत मेघदूताची छाया कशी पडली आहे, तें दाखवून, डॉ. श्रीखंडे यांनीं या प्रस्तावनेंत एक मोठी कामगिरी बजाविली आहे. याशिवाय, प्रा. रा. श्री. जोग, डॉ. रा. ग. हर्षे, इ. विद्वानांच्या मेघदूतावरील आक्षेपांचें यथार्थ खंडन (पृ. ७४-७८; २०; इ.) व त्यांतील गुणांचें दिग्दर्शन (पृ. १-९; ३३-३५; ७८-८७; इ.) इ. अनेक विषयांच्या सांगोपांग व मार्मिक अभ्यासानें ही लांबलचक प्रस्तावना विभूषित केली आहे. अभ्यासकाच्या दृष्टीने या प्रस्तावनेमुळे हा मराठी भाषेंतील एक फार महत्त्वाचा व मौल्यवान् ग्रंथ झाला आहे. असें 'विद्वत्त्वं च कवित्वं च' एकत्र आलेलें पाहून आश्चर्य वाटतें. पण या गृहस्थांचा उपजीविकेचा धंदा वाङ्मयाचा प्राध्यापक म्हणून नसून, डॉक्टर म्हणून आहे, हें लक्षांत घेतलें असतां तें आश्चर्य द्विगुणित होतें!

---

अनुक्रमणिका

# जीर्णोद्धार !

[ जाति : पादाकुलक ]

भग्न जाहलें विशाल मंदिर !
वीज पडूनी चिरे निखळले,
सुरुंग अथवा कुणीं लाविले !
ढिगारेच कोसळले भूवर !

गाभाऱ्यांतच कळस गाडला !
दगडी अवजड ओझ्याखालीं-
ठिकऱ्या होउनि मूर्त भंगली !
शिल्पाला ये घोर अवकळा !

चुनखड धुतली वर्षासरिनें,
हिमवर्षानें दगड गोठले,
तप्त उन्हांनी खांब उकलले !
फटींत घुमलीं पिशाचगानें !

शिल्पकार कुणि तेथ पातला;
कलात्मतेची ओढ लागुनी,
अंतर आणी त्यास खेचुनी,
पुशित आंसवें मुग्ध थांवला !

विशाल दृष्टी फिरली भंवती,
नीलाकाशीं उंच भरारे,
प्रेरक व हिं शिरलें वारे,
टाकी चालवि दगडावरती.

पोट बांधुनी काम चालवी.
कुणि वेड्यांतच त्यास काढलें,
कुणि कानूंनीं छळुन नाडलें !
परि दे रूपें दगडास नवीं.

ऐटबाज कुणि पोशाखाचे
वन्यविहारा युवयुवतीजन
खिदळत आले मोटारींतून,
तऱ्हेदार किति झोक तयांचे !

आरामाचें झालें भोजन;
छायाचित्रें भग्न शिळांवर
घेउन झालीं कलामनोहर;
आनंदाने करिती विहरण.

शिल्पघडणिची ऐकुन टाकी-
"व्यर्थ परिश्रम" म्हणति "कशाला
घेसीं मंदिर उभवायाला ?
उध्वस्त असें देउळ राखी !"

"उध्वस्त न का ऐसें जीवन ?
प्रतीक त्याचें पहा ढिगारे,
भग्नाशांचीं हीं खिंडारें,
कलेस रुचतें वास्तव भीषण !"

"उध्वस्त असें जीवन अमुचें !! —"
वदुन तयांनीं श्वास टाकिले
डोळे आनंदाने हसले
स्तिमित चित्त हो शिल्पज्ञाचें !

नजर तयांच्या आरामावर
भ्रूसंकोचें भेदक फेकी;
निःश्वासुन, घे हातीं टाकी,
भुकाळ पोटीं घडवी फत्तर !

१२ ऑगस्ट १९५०
विश्रामबाग, सांगली,

—गिरीश



अनुक्रमणिका

# भारतीय पक्षिनामावलि

लेखक— डॉ. म. वि. आपटे, बी. एस्सी.; एम्. बी. बी. एस्.
कैवल्यधाम, लोनावळे.

सर्व जीवांमध्ये मनुष्य श्रेष्ठ आहे. जीवमात्राच्या दोन कोटि; स्थावर आणि जंगम. त्यांपैकीं जंगमांत आपण जमा आहोंत. तथापि आपण जंगमत्वांत कांहीं श्रेष्ठ नाहीं. या बाबतींत आपणापेक्षा पक्षी श्रेष्ठ ठरतात. अन्न, वस्त्र आणि घर या बाबतींत आपण स्थावर सृष्टीवर अवलंबून आहोंत. अन्नाकरतां आपण पक्ष्यांचा उपयोग करतों. पण तो थोडा. एका काळीं पक्ष्यांचा उपयोग संदेश पोचविण्याकरतां करीत असत. नलदमयन्ती-कथेंत हंसाचा उपयोग या कामीं केल्याचा उल्लेख आहे. ती कथा कोणी कल्पित मानतील तर मानोत; पण पहिल्या महायुद्धांत कबूतरांचा उपयोग संदेशवाहनार्थ करीत ही गोष्ट तर अगदी अलीकडील इतिहासांतली आहे. संदेश पोचविणें हा साक्षात् उपयोग झाला. पण पर्यायानें होणारे पक्ष्यांचे उपयोग किती तरी आहेत. उपयोग किंवा उपकार म्हणा पाहिजे तर. पक्ष्यांना मोठी उपकारबुद्धि असते असें नव्हे. आपण स्वार्थी तसे पक्षीहि स्वार्थीच असतात. कित्येक पक्ष्यांचा स्वार्थ आपल्या पथ्यावर पडतो म्हणून त्याला उपकार म्हणावयाचें इतकेंच, त्यांचा स्वार्थ आपल्या हिताच्या आड आला म्हणजे तो अर्थातच अपकार म्हणावयाचा. धान्य खाणारे पक्षी आपणांस अपकार करतात आणि पिकांवरील किडे खाणारे पक्षी आपणांवर उपकार करतात असेंच नव्हे काय? आपले उपकर्ते आणि अपकर्तेहि आपणांस माहीत पाहिजेत. एकाचा पुरस्कार आणि दुसऱ्याचा तिरस्कार करणें अवश्यच आहे.

पक्ष्यांचा अभ्यास करावयाचा म्हणजे त्यांच्या जाती ओळखणें आलेंच. त्याकरतां त्यांना स्पष्टार्थक नांवेंहि पाहिजेत. हा उद्योग कांहीं नवीन नाही. संस्कृत आणि प्राकृत भाषांत आज शेदोनशे पक्षिनांवें रूढ आहेत. आधुनिक शास्त्रज्ञांनीं यांच्या दसपट पक्षिजाती ओळखून ठेवल्या आहेत. इतकीं नांवें कशीं तयार करावयाचीं असा खरा आजचा प्रश्न आहे. ज्यांनी हे जाती ओळखण्याचें काम केलें आहे त्यांनी नांवेंहि करून ठेविलीं आहेत पण तीं आहेत लॅटिन आणि इंग्रजी. मराठींत तीं साजरीं होतील का? नसलीं तर तशीं नवीं करतां येतील का? हेच प्रश्न सोडविण्याचा थोडासा उपक्रम करून दाखवीत आहें.

## वर्गवारी

आधुनिक शास्त्रज्ञांनी एकंदर भारतीय पक्षिजातींचीं ६१८ गोत्रें, ८५ गण आणि १५ प्रगण कल्पिलेले आहेत. यांपैकीं १३ प्रगणांतील पक्ष्यांच्या जातींचीं नांवें हजारो वर्षांपूर्वींच्या वाङ्मयांत आढळतात. कावळा, चिमणी माहीत नाहीत असा कोण आहे? या काऊचिऊच्या प्रगणांतच निम्याहून अधिक जातींचा भरणा आहे. बुलबुल, मैना, साळुंकी,

श्यामा, खाटिक, परीट, विणकर या सर्वांचा समावेश या काऊचिऊंच्या प्रगणांतच होतो. दुसऱ्या प्रगणांत सुतार, तांबट, पोपट, धींवर, हूप, पाकोळी आणि घुब्रड यांचा समावेश होतो. घार, गिधाड, ससाणा, यांचा समावेश तिसऱ्यांत होतो. कपोत, पारावत, इत्यादींचा चौथा प्रगण कल्पिलेला आहे. पांचव्या प्रगणांत विशेष प्रसिद्ध जात पाकोरडी एवढी एकच आहे. मोर, कोंबडा, तित्तिर, यांचा सहावा प्रगण मानतात. सातव्यांत लाव एवढी एकच प्रसिद्ध जात आहे. पाणकोंबडा, करकोचा आणि सारस यांचा आठवा प्रगण केला आहे. नववा प्रगण टिटवीचा. दहाव्यांत व अकराव्यांत विशेष प्रसिद्ध जात नाही. बाराव्यांत बगळयाचा समावेश आहे. तेराव्यांत एखादी दुसरीच जात आहे. चौदाव्यांत हंसाचा अंतर्भाव आहे. पंधराव्यांत प्रसिद्ध जात नाही.

| क्रम | प्रगणनाम | जातिसंख्या | गोत्रसंख्या | गणसंख्या |
|---|---|---|---|---|
| १ | काक–आदिम | १३३६ | ३०४ | ३२ |
| २ | पिक–आदिम | ३६७ | ९२ | १६ |
| ३ | श्येन–आदिम | १२२ | ३२ | ३ |
| ४ | कपोत–आदिम | ६२ | १८ | १ |
| ५ | पाकोर–आदिम | ९ | २ | १ |
| ६ | कुक्कुट–आदिम | ९९ | ३४ | २ |
| ७ | लाव–आदिम | १० | १ | १ |
| ८ | सारस–आदिम | ४१ | २३ | ६ |
| ९ | टिट्टिभ–आदिम | १२९ | ५१ | ९ |
| १० | पाशानन–आदिम | १८ | ६ | ५ |
| ११ | नासानाल–आदिम | १८ | ४ | १ |
| १२ | बक–आदिम | २९ | २१ | ४ |
| १३ | लोहित–आदिम | २ | १ | १ |
| १४ | हंस–आदिम | ४७ | २६ | १ |
| १५ | वंजुल–आदिम | ४ | २ | २ |
| | | २२९३ | ६१८ | ८५ |

## व्युत्पत्ति

आज रूढ असलेलीं पक्षिनामें कशावरून निघालेलीं आहेत या गोष्टीचा विचार केला असतां आणखी नवीन पाहिजे। तीं नांवें कशीं मिळूं शकतील तें आपल्याला सुचूं शकेल. काव काव करतो तो कावळा, चिव चिव करते ती चिमणी अशीं हीं दोन नांवें निघालेलीं आहेत हें निर्विवाद आहे. मयूर, कुकुट, टिट्टिभ, तित्तिर, घूक, हंस हीं नांवें सुद्धा त्या त्या पक्ष्याच्या ओरडण्यावरूनच निघालेलीं आहेत. कोकिल हा शब्द त्या पक्ष्याच्या ओरडण्याहून वेगळा दिसतो. परंतु त्यांतलें आरंभिक व्यंजन तरी निदान त्या ओरडण्यातलेंच आहे. तो कशावरून निघाला असावा? तोहि पिक पक्ष्याच्या ओरडण्यावरूनच निघाला असावा. मध्यभारतांत 'पावशा' या नांवानें प्रसिद्ध असलेला एक पक्षी कोकिल गणांत आहे.

त्याच्या ओरडण्याचें वर्णन तेथील लोक 'पाऊस आला' असें करतात. याच ओरडण्याचें वर्णन हिंदी बोलणारे लोक 'पी कहां?' असें करतात. हाच खरा पिक! आणखी एक कोकिलगणांतलाच पक्षी आहे; त्याच्या ओरडण्याचें वर्णन 'पी ऊ' असें करतात. तो पावसापूर्वी चार आठ दिवस आफ्रिकेंतून भारतांत येतो. म्हणून हा पाऊस आणतो आणि पावसाशिवाय पाणी पीत नाहीं, असे लोकवाद उत्पन्न झालेले आहेत. याला चातक म्हणतात, कारण हा मेघाचा याचक आहे! **याचकस्वभावावरून चातक** हें नांव निघालें आहे.

**साळुंकी** आणि **मैना** हे शब्द मोठ्या घोटाळ्याचे झाले आहेत. साळुंकी नांवाच्या निदान चार तरी पक्षिजाती दक्षिणेंत आहेत. या सर्वांना उत्तरी लोक मैना म्हणतात. याशिवाय आणखी एक जात पहाडी मैना म्हणून प्रसिद्ध आहेच. मनुष्यवाणीचें उत्तम अनुकरण करणारी काळी मैना ती पहाडी मैनाच होय. हिलाच संस्कृतांत सारिका म्हणतात.

पृच्छन्ती वा मधुरवचनां सारिकां पंजरस्थाम् ।
कच्चित् भर्तुः स्मरसि रसिके त्वं हि तस्य प्रियेति ॥ मेघदूत **२.२५**

या वचनांत रसिका तीच सारिका अशी व्युत्पत्ति कवि सुचवीत आहे, **नव्हे का!** मैना हा शब्द तुर्की किंवा चिनी आहे असें म्हणतात; परंतु तो **मीनाक्ष** यावरूनहि निघाला असणें संभवनीय आहे. साळुंकी हा शब्द सारिका यावरून निघालेला आहे. साळुंकी आणि मैना हे शब्द सरमिसळ वापरले गेले असले तरी, अनेक जाती आहेत आणि अनेक शब्द आहेत, म्हणून एकेका शब्दाचा मेळ एकेका जातीशी घालणें हेंच उचित आहे. असें करूनहि शब्दांपेक्षा जाती अधिक असल्यामुळें अधिक शब्द घडवावे लागणार आहेत. शालिक, सालुंक, शैलिक, शालंक, असे आणखी चार शब्द सहज सुचतातहि.

स्वभावतः शिकवणीशिवाय उत्तम गाणारी पक्षिजाति आहे ती **श्यामा** होय. हें नांव अर्थातच रंगावरून पडलेलें आहे. **बुलबुल** जाती अनेक आहेत. त्यांना बोलकेपणावरूनच हें नांव मिळालेलें आहे. बुलबुलांपैकीं एक लढाऊ वृत्तीचा आहे तो **योधन**, दुसरा शेंडीवाला आहे तो **शिखावन्त**, तिसऱ्याची भुवई पांढरी आहे तो **सितभ्रू** अशीं नांवें देण्याजोगीं आहेत. घरटें विणण्यांत विशेष कौशल्य प्रकट करणारा पक्षी आहे त्यास **बाया** म्हणतात. हा शब्द विणकर या अर्थी **वयक** या (वे वयति) शब्दावरून निघालेला आहे. परीट, सुतार, तांबट इत्यादि पक्षिनामें उघडपणें त्या त्या पक्ष्यांच्या वर्तनावरून लक्षणेनें दिलेलीं दिसतात.

**घार**, **गिधाड**, हीं नांवें ग्राह, गृध्नु (=हावरा) या शब्दावरून त्या त्या पक्ष्यांचें वर्तन दर्शविण्याकरतांच योजिलेलीं आहेत. **श्येन** हा शब्द रंगवाचक आहे. मराठी ससाणा हा शब्द त्यावरून निघाला असावा. ससाण्याचा उड्डाणवेग इतका मोठा असतो की केवळ उड्डाणाच्या आरंभीं आणि शेवटींच तो पक्षी आपल्याला दिसूं शकतो. मध्यंतरीं केवळ एक रेघच दिसते. पक्ष्याचें अस्तित्व त्याच्या झपाट्यावरूनच जाणावयाचें. या झपाट्यानें जो आवाज निघतो तोहि **ससाणा** या शब्दांत अनायासें व्यक्त झालेला आहे. सण-ण-ण-ण-ण करीत जाणाऱ्या बाणाला कवि ससाण्याची उपमा देतात.

पाण्यांत किंवा त्याच्या आसपास आहारविहार करणाऱ्या पक्षिजाति पुष्कळ आहेत; त्यांतल्या एका जातीस **सारस** म्हणतात. सरस् म्हणजे सरोवर. त्याच्या आसपास राहणारा तो सारस. **करकोचा** हा शब्द **क्रौंच** या शब्दापासून झाला. या पक्ष्यांना कंठांतून आवाज

अनुक्रमणिका

काढतां येत नाही. परंतु ते हनुवटी हालवून कर् कर् कर् असा आवाज काढतात. त्यावरून हीं नांवें निघालेलीं दिसतात. कंक हें नांव देखील असेंच आहे.

पुष्कळ जातींना बगळे म्हणतात. मत्स्यांची फसवणूक करून त्यांना पकडणारा अशी या पक्ष्याची ख्याति आहे. यांना वंचक या अर्थी वक असें नांव मिळालेलें दिसतें. देशांतराला जाणारे पक्षी म्हणून बलाकांचा उल्लेख संस्कृत वाङ्मयांत आलेला आहे. या पक्ष्यांच्या झुंडीच्या झुंडी हिमालय ओलांडून जातात. म्हणून त्यांना बलाक असें नांव मिळालें असावें. (बल=सैन्य, अञ्च्=भटकणें.)

काळसर रंगाच्या हंसाला कादम्ब असें नांव आहे. त्यापासूनच पाळीव बदकें निर्माण झालीं असा इतिहास आहे. बदक हें नांव सुद्धा कादम्ब या शब्दावरून निघालेलें दिसतें. बदक हा शब्द फारशी आहे असें कोशकार लिहितात. परंतु तो कादंब या शब्दावरून निघाला असण्याचा संभव अधिक आहे. पक्ष्यांची उत्पत्ति आणि शब्दांची व्युत्पत्ति यांचें साहचर्य स्पष्ट आहे. हंसगणांतील पुष्कळ जातींना संस्कृत नांवें आढळतात तीं अशीं:—हंस, हंसक, राजहंस, कलहंस, नंदीमुख, काणूक, कादम्ब, मराळ, चक्रवाक.

बकवर्गांतील पुष्कळ जातींना नावें पाहिजेत तीं अञ्च् धातूवरून करण्याजोगीं आहेत. उदाहरणार्थः—तीरांच, नीरांच, उदंच, गवांच, शरांच. कांही बगळ्यांच्या चोची खाली वाकलेल्या असतात त्यांना अवाक्‌चंचु या अर्थी अवाक असें म्हणतां येईल. या पक्ष्यांना वाक् इंद्रिय नसतें म्हणूनहि त्यांना अवाक हें नांव शोभतें. यांना वाचा अगदींच नसते असें नाहीं तर विवाहप्रसंगींच केवळ थोडीशी असते म्हणून किंवाक, कवाक, कद्‌वाक अशीं आणखीं तीन नावें त्यांना देण्याजोगीं आहेत. त्यांना इंग्रजी 'इबिस' असें नांव आहे.

एका पक्षिजातीचें नांव पाकोळी असें आहे. या पक्ष्यांना तारेवर किंवा बारीक काठीवर बसतां येत नाही. कारण त्यांच्या पायांस चार चार बोटें असून तीं सर्व पुढें रोखलेलीं असतात. त्यांना जमिनीवर बसतां येतें किंवा भिंतीस चिकटतां येतें किंवा वर छतास लटकतां येतें. साधारण पक्ष्याप्रमाणें यांना दांडीवर बसतां येत नाही म्हणून यांना पंगु, पांगळी, पाकोळी, अशीं नांवें मिळालीं असलीं पाहिजेत. पाकोळी म्हणजे दुर्बलतेचें प्रतीक असा समज आहेच. पाकोळी पायाने दुर्बल असली तरी पंखांनी प्रबल असते. तिचा उडण्याचा झपाटा मोठा असतो म्हणून तिला इंग्रजींत स्विफ्ट म्हणतात. या शब्दाचें भाषांतर झटक असें होऊं शकेल.

## नवीन संकेत

पक्ष्यांच्या एकंदर जीवनाचा विचार करून शास्त्रज्ञांनी त्यांचे वर्ग केलेले आहेत. या वर्गीकरणाला अनुसरूनच त्यांनी जातिनामें ठरविलेलीं आहेत. जातिनाम दुहेरी किंवा तिहेरी करण्याचा प्रघात आहे. अशा नांवांखाली पहिला शब्द गोत्रवाचक असावयाचा आणि दुसरा जातिविशेषवाचक असावयाचा असा संकेत आहे. एकंदर भारतीय पक्षिजाती जरी २३०० म्हटल्या असल्या तरी त्यांतल्या बऱ्याचशा खरोखरी उपजाति आहेत. त्या केवळ प्रादेशिक भेदानें उत्पन्न झालेल्या आहेत. उदाहरणार्थ श्याम पक्ष्याच्या चार (उप) जाति मानतात. त्यांच्या शेपटीच्या लांबीचें प्रमाण आणि रंगाच्या छटा यांतच काय तो थोडासा भेद दिसून येतो. भारत, अंदमान, लंका आणि ब्रह्मदेश या चार निवासस्थानांतील पक्ष्यांत तो आढळतो म्हणून त्यांना तद्देशीय असें विशेषण जोडतात. यामुळें जातिनाम तिहेरी होतें.

एकंदर नामावलीमध्यें ६१८ गोत्रें आहेत. आणि एकेका गोत्रांत सरासरी चार जाती आहेत. आतां वरील रूढरीतींपैकी कोणत्यातरी रीतीनें जर प्रत्येक गोत्रांतील एकेका जातीला एकेक सुटसुटीत नांव देतां आलें तर काम पुष्कळ सोपें होण्याजोगें आहे. ज्ञातिनामाला **आदि** असें पद जोडून **गोत्रनाम** सिद्ध करावें. याच गोत्रांतल्या इतर जाती दर्शविण्याकरतां त्या त्या जातीचा विशेष दाखविणारा शब्द पुढें ठेवावा म्हणजे झालें. उदाहरणार्थ मासा खाणाऱ्या तीन पक्षिजाती एका गोत्रांत आहेत. त्यांपैकीं एका जातीला **मक्षाद** असें नांव द्यावें. त्यावरून **मक्षादादि** असें गोत्रनाम सिद्ध होतें. इतर दोन जातींचीं नांवें त्यांच्या रूपावरून **अरुणकंठ** आणि **अरुणशीर्ष** अशीं सुचतात. दुसऱ्या एखाद्या गोत्रांतहि अरुणकण्ठ पक्षी आढळेल तर तशी संदिग्धता टाळण्याकरतां **मक्षादादि अरुणकण्ठ** असें जोड नांव वापरावें. ज्या जातीचें नांव मक्षाद ठेवलें त्या जातीचा संपूर्ण उल्लेख **तदादि मक्षाद** असा करावा. याच रीतीनें सर्व जातींचीं जोडनांवें घडवितां येतात.

अनेक जातींचें एक गोत्र गणतात तसाच अनेक गोत्रांचा एक गण गणतात. गणाचें नांवहि त्यांतील प्रमुख जातीवरून करावें. असें करतांना **आद्य** असें पद अन्तीं जोडावें म्हणजे झालें. जसें **मक्षादाद्य** गण. अनेक गणांचा एक प्रगण करतात. तेव्हां प्रगणवाचक शब्द करण्याकरतां प्रमुख जातिवाचकास **आदिम** असें पद अंतीं जोडावें. जसें **काकादिम प्रगण.**

कपोताद्य गणांत नित्य परिचयाची पारावत ही एक जात आहे. तिच्याच जोडीला दुसरी एक हिरवी जात आहे तिला हारावत असें नांव सहज सुचतें. यांखेरीज कबूतर ही एक जात आहेच. या गणांतील जातीजातींमध्यें नित्य संकरसंतति उत्पन्न होत असल्यामुळें बहुत जाती निर्माण होत आहेत. त्या सर्वांना नांवें काढणें कठीणच जाणार आहे. शेवटीं अंक योजून काम भागवावें लागेल !

श्येनादि गोत्रांतील एका जातीला **लगार** म्हणतात. हेंच नांव परिभाषेंत घेण्यास प्रत्यवाय नाहीं. सबंध नांव **श्येनादि लगार** असें तयार होईल. दुसऱ्या एका जातीचें ओरडणें किड्रीक असें आहे. तेंच नांव नांव म्हणून चालण्याजोगें आहे. सबंध नांव **श्येनादि किड्रीक** असें होईल. तिसऱ्या एका जातीचें ओरडणें **कुर्वाल** असें असतें. तेंहि नांव साजण्यासारखें आहे. मुख्य श्येन हा अर्थात् **तदादि श्येन** म्हणावयाचा.

परिभाषा ठरवतांना केवळ भारतीय पक्षीच ध्यानांत धरले असले तरी त्यांना लावलेली भाषा-संकेत-सरणी इतरांनाहि लावण्याजोगी आहे हें उघड आहे. भारतीय पक्षिसमूह हा विविध आणि विपुलहि असल्यामुळें ही गोष्ट आपोआप घडून येते. एवढ्या समूहास लागू पडणारी संकेतसरणी परिशेषास लागू पडण्यास प्रत्यवाय नाहीं.

एवंच पक्षिनामावलि तयार करणें ही गोष्ट दुर्घट आहे असें जरी आरंभीं वाटलें तरी प्रयत्नतः ती सुघट गोष्ट आहे असें प्रत्ययास येतें.

---

# आमचें गद्य व आमचें पद्य

लेखकः— डॉ. पु. ग. सहस्रबुद्धे, एम्. ए., पीएच्. डी.

गेल्या शतकांतील मराठी वाङ्मयाच्या या दोन शाखांकडे दृष्टि टाकल्यास आमच्या गद्याचें अतुल वैभव आणि पद्याचें कमालीचें दारिद्य ध्यानांत येऊन मन आनंद, विस्मय व खेद यांनी भरून येतें; आणि आमच्या गेल्या शंभर वर्षांतील काव्यकारांविषयीं व त्यांनीं निर्माण केलेल्या काव्यांविषयीं अनेक प्रकारचे विचारतरंग मनांत येऊन गेल्या सवाशे वर्षांचा मराठी काव्याचा इतिहास म्हणजे स्वतःच एक शोककाव्य आहे असें वाटूं लागतें.

इंग्रजी भाषेच्या द्वारा पाश्चात्य जगाची येथल्या लोकांना ओळख झाल्याबरोबर त्यांचें डोळे उघडले. आणि येथल्या समाजाचें नेमकें दुखणें कोणतें, भारतवर्षाची अवनति कशाने झाली व आतां उत्कर्ष साधावयाचा असेल तर काय केलें पाहिजे याचें सम्यक् ज्ञान त्यांना झालें; आणि मराठी गद्य पंडित अत्यंत उत्साहाने त्या कामाला लागले. आमच्या मधली सर्वांत मोठी उणीव म्हणजे भौतिक ज्ञानाचा अभाव, हें या लेखकांच्या ध्यानीं येऊन त्यांनी एकदम त्या कार्याला हात घातला. भाऊ महाजन, बाळशास्त्री जांभेकर, दादोबा पांडुरंग यांनी पाश्चात्य ज्ञानाचा नुसता ध्यास घेतला होता. आणि दिग्दर्शन, ज्ञानदर्शन, ज्ञानप्रसारक, ज्ञानसंग्रह, दर्पण, प्रभाकर इ. अनेक नियतकालिकें काढून तें ज्ञान येथल्या लोकांत पसरून देऊं लागले. इतर लेखकांनीहि निबंध, ग्रंथ, व्याख्यानें या साधनांनी या कार्याला साहाय्य केलें. म्हणजे हे सर्व कालवेत्ते होते, जाणते होते व नवयुगाचें ओझरतें तरी दर्शन त्यांना घडलें होतें. त्यामुळेच त्यांना स्फूर्ति प्राप्त होऊन तें युग जवळ आणण्याची त्यांनी कमालीची धडपड चालविली होती.

याच काळांत आमच्या समाजरचनेंतील अनेक दोष येथील लेखकांच्या ध्यानीं येऊं लागले. आणि ज्योतिबा फुले, विष्णुबुवा ब्रह्मचारी यांनी अगदीं निर्भयपणें ते दोष दाखवून समाजाच्या पुनर्घटनेचे मार्ग व तत्त्वें लोकांना सांगितलीं. लोकहितवादींचीं शतपत्रें आपण वाचून पाहिलीं तर असें दिसतें कीं आज शंभर वर्षांनी राजकारण, समाजकारण, धर्म, अर्थ-व्यवस्था या क्षेत्रांत आपल्या ज्या आकांक्षा आहेत त्या स्थूल मानाने त्यांनी व्यक्त केल्या होत्या. येथे लोकशाही प्रस्थापित झाली पाहिजे आणि येथील लोक कार्यक्षम झाल्यावर ब्रिटिशांनी हा देश सोडून येथून निघून गेलें पाहिजे, नाही तर येथे रेव्होल्यूशन होईल. हे विचार त्यांनी १९४७ सालींच मांडले होते. मालाकारांच्या पूर्वीच्या कालखंडांतील गद्य लेखकांची कामगिरी पाहिली तर ती याप्रमाणें मोठी अभिमानास्पद वाटते.

पण या काळांतील कवींकडे पाहिलें तर काय दिसेल ! त्यांना या नव्या युगाची मुळीच चाहूल लागलेली नव्हती. काळ बदलल्याची कसलीहि जाणीव त्यांना झालेली नव्हती.

पाळंदे, निजसुरे, सर. टी. माधवराव, चिंतामणि पेठकर, कीर्तिकर यांच्या कवितेंतून नव्या काळाचे पडसाद ऐकूं येत नाहींत. गद्य लेखकांना पाश्चात्य भौतिक विद्येची महती समजली, हिंदुधर्माला आलेली विकृति पाहून त्यांना खेद झाला, समाजांतील चातुर्वर्ण्य, जातिभेद ही विषमता पाहून ते अस्वस्थ झाले. दारिद्र्य आपल्याला ग्रासीत चाललेलें पाहून ते चिंताग्रस्त झाले, स्त्रियांची दैन्यावस्था पाहून त्यांच्या चित्तांत अनुकंपा निर्माण झाली आणि या सर्वांची बहुतेक अचूक कारणमीमांसा करून त्यांनी कांहींसें कार्यहि आरंभिलें. पण आमच्या कवींच्या हळुवार हृदयाला हे कंप जाणवले नाहीत व 'दिक्कालांतून आरपार' बघूं शकणाऱ्या त्यांच्या दृष्टीला वर्तमान काळहि कळला नाही; मग भविष्य काळांतलें कांहींच उमगलें नसलें तर त्यांत आश्चर्य तें काय?

विष्णुशास्त्री, टिळक, आगरकर यांनी गद्यलेखनांत महाराष्ट्रांत एक अत्यंत तेजस्वी अशी नवी परंपरा निर्माण केली. वर्तमान व आगामी काळाचें सम्यक् आकलन करणें, जगाला वळण लावणाऱ्या तत्त्वज्ञानांतील विचारसंपदेचें ग्रहण करणें, उत्कर्षाची मीमांसा करणें व तिच्या आधारें नवा मार्ग आखणें हें सामर्थ्य तर त्यांच्या ठायीं होतेंच; पण त्यांना जें नवीन तत्त्वज्ञान सांगावयाचें होतें त्यासाठी वाटेल त्या यातना, कष्ट, वाटेल तो देहदंड, अवमान इत्यादि सर्व सोसण्याचें नीतिधैर्य त्यांच्या अंगीं होतें. मराठी गद्याला जें अलौकिक वैभव प्राप्त झालें तें त्यांच्या या तपश्चर्येमुळेच होय. आम्ही जें मनांत आणूं तें लिहूं, त्यापासून आम्हांस परावृत्त करण्याचें सामर्थ्य कोणत्याहि शक्तीला नाही असा त्यांचा बाणा होता. आमची नोकरी गेली, संसार उधळला, आणि शेवटीं प्राणहि खर्ची पडले तरी आम्हांला जें लिहावयाचें आहे तें आम्ही लिहीत राहणारच अशी त्यांची प्रतिज्ञा होती. मराठी गद्य-लेखकांची ही रग पाहून सरस्वती त्यांच्यावर प्रसन्न झाली व तिनें त्यांना अमर केलें.

अशा तऱ्हेची रग, हें नीतिधैर्य, ही ताठर वृत्ति त्या काळच्या कवींनी प्रकट केली आहे काय? चवकशी न केलेली बरी असेंच चवकशी केल्यानंतर ध्यानात येईल. आगरकरांनी प्रतिपादित केलेल्या तत्त्वज्ञानाचे थोडे अस्पष्ट असे पडसाद कांही कवींच्या काव्यांतून उमटतात. यापलीकडे कांही नाहीं. विष्णुशास्त्री, टिळक यांचा तर वाराहि कवींना सहन होत नसावा असें दिसतें. असे कोणी दोन पुरुष होऊन गेले होते, त्यांनी राष्ट्रनिष्ठेचें प्रचंड आंदोलन निर्माण केलें होतें, त्यानें सर्वसमाज भारून गेला होता, याचा पुसट वाससुद्धा मराठी कवींच्या काव्यांतून येणार नाही. केसरी, काळ, सुधारक यांतून येणाऱ्या लेखांनी महाराष्ट्राचें रूप अंतरबाह्य पालटून गेलें व त्याच्या ठायीं नवचैतन्य निर्माण झालें. पण आमच्या कवींच्या लेखनाचा याशीं दुरूनहि संबंध नव्हता. नवयुग तर यांनीं आणलें नाहीच, पण आलेलें जाणलेंहि नाही. क्वचित् कोठें आगरकर, टिळक यांचा त्यांच्या काव्यांतून निर्देश येतो त्यावरून त्यांना या तऱ्हेची कांहीं माहिती होती एवढें दिसून येतें. पण बाकी नवचैतन्याच्या या सागरांत हे कवि 'अलिप्त कमळ जळीं जैसें' असे होते. ते लहान होते; त्यांना कांही कळत नव्हतें आणि कळण्याची ऐपतहि त्यांना नव्हती.

पहिल्या महायुद्धानें सर्व जग हादरून गेलें. हा हादरा केवळ रक्तपात, कत्तली, विध्वंस यांचा नव्हता. जुन्या जगांतल्या सर्व तत्त्वज्ञानाला हा हादरा बसला होता; विज्ञाना-बद्दलच्या विलक्षण आशा लोकांच्या मनांत होत्या त्यांची राख झाली. प्रगतीच्या कल्पना वाऱ्यावर विरून गेल्या; युरोपियन राष्ट्रांच्या श्रेष्ठतेची प्रतिष्ठा आशिया खंडांतून नाहींशी

झाली; अर्थव्यवस्थेचा बोजवारा उडाला. अशा तऱ्हेने जुनीं सर्व मूल्यें बदलून गेलीं आणि मानव हतबुद्ध होऊन जुन्या जगाच्या राखेकडे पाहत उभा राहिला. त्यांतून मार्ग दाखविण्याचें कार्य कोणाचें होतें? क्रांतदर्शी कवींचे! 'जगत्क्रान्तिचें महाभविष्य सांगाया आम्ही येतों,' असा अभिमान बाळगणाऱ्या कवींचें हें कार्य नव्हतें काय? पण त्या वेळीं कवि काय करीत होते? गोविंदाग्रज, बालकवि, रेंदाळकर, इ. कवींना विचारून पाहा. मी तरी काय सांगणार!

महायुद्धाच्या नंतर यामुळें हतबुद्ध झालेल्या जगाला मार्गदर्शन व्हावें यासाठी मार्क्सवादी लोकांनी एक अतिप्रचंड आंदोलन निर्माण केलें. रशियांत लेनिन, ट्रॉट्स्की या महापुरुषांनी जी प्रचंड क्रांति केली तिचे पडसाद जगभर उमटले व प्रत्येक देशांत कम्युनिझमचें चैतन्यमय, अग्निज्वालेसारखें प्रखर व स्फूर्तिदायक तत्त्वज्ञान पसरूं लागलें. आपला देश त्याला अपवाद नव्हता, महाराष्ट्र तर मुळीच नव्हता. उलट त्याचा कार्यारंभ महाराष्ट्रांतच डांगे, जोगळेकर, मिरजकर यांनी केला. याची त्या वेळच्या काव्यांत गंधवार्ताहि आढळत नाही. त्या वेळच्या कवींनी आपला संबंध रविकिरणांशीं जोडला होता. त्यांतले एक कवि म्हणाले की, जुन्या कवींना मार्ग दिसत नव्हता. ते वाटाड्यासाठी खोळंबून होते, आणि माधवराव पटवर्धनांनी त्यांना वाट दाखविली. ती वाट कोणती हें कळणें कठिण आहे. पण तिचा जगांतल्या कोणत्याहि परिवर्तनाशीं संबंध नव्हता, आणि या मार्क्सवादी आंदोलनाशीं तर निश्चितच नव्हता. प्रत्यक्ष समाजांत १९१८ नंतरच्या वीस वर्षांत हें नवीन तत्त्वज्ञान खोलवर रुजूं लागलें होतें. तेथें कामगारांचें संप झाले, सार्वत्रिक संपाची भाषा सुरू झाली, प्रचंड संघटना निर्माण झाल्या, कानपूर कटाचा खटला झाला, त्याचे पडसाद जगभर उमटून मिरत कटाचा खटला झाला. सरकारला कम्युनिस्टांना दिलेल्या शिक्षा थोड्या सौम्यहि कराव्या लागल्या. इतकें सर्व होऊन गेलें. पण रविकिरणमंडळाला याचें सोयरसुतक नव्हतें. मार्क्सवाद निर्माण झाला, रशियांत त्याची अधिकृत स्थापना झाली, हिंदुस्थानांत त्याचें लोण आलें; रशियांत त्याची पहिली जागतिक अवस्था संपून त्याला राष्ट्रवादी वळणहि मिळालें. आणि मग कांहीं वर्षांनीं महाराष्ट्रांतील कवींच्या ध्यानांत आलें की, अरे कामगारांना किसानांना भाकरी नाही. मग ते म्हणाले 'भाकरी नाही खावया'. याचा अर्थ असा की, एखादी नवविचारांची लाट यावयाच्या आधी कवींना कळत नाहीच; पण आल्यावरहि त्यांना कांही कळत नाही! पुढाऱ्यांना ती कळली, गद्यलेखकांना कळली, शेतकरी, कामकरी यांच्यापर्यंत जाऊन पोचली, त्यांच्या संघटना झाल्या, संग्राम झाले म्हणजे मग क्रान्तदर्शी कवींच्या तें ध्यानांत येतें, आणि मग आपल्या ओजस्वी भाषेंत ते काव्य करूं लागतात. या लाटांशीं आमचा संबंधच नाही असें त्यांचें मत नाही. संबंध आहे असें त्यांना निश्चित वाटतें. कारण आतां सगळ्यांच्या मागून त्यांनी त्याविषयीं कितीतरी गिल्ला चालविला आहे. कोणी तैमूरला बोलावतो आहे, कोणी चंगीजखानाला हांका मारतो आहे, कोणी सुसज्वालामुखी पेटवतो आहे, कोणी यज्ञकुंडांतून द्रौपदी वर आणीत आहे. तेव्हा हा विषय आपला आहे ही त्यांची समजूत आहे यांत शंका नाही. फरक येवढाच आहे की गद्यलेखकांनी ते विचार सांगून त्याच्यासाठी शिक्षा भोगल्यानंतर, बहुजन समाजांत ते पसरल्यानंतर, मग कवि त्यांना क्रान्तीचा संदेश देऊं लागतात.

गेल्या तीस वर्षांतल्या महात्माजींच्या सत्याग्रहसंग्रामाची व त्यामुळे निर्माण झालेल्या क्रांतिप्रवृत्तीची तीच अवस्था आहे. या तत्त्वज्ञानामुळे लढे झाले, कायदेभंगाच्या मोहिमा

झाल्या, सैन्यापर्यंत तें लोण पोचलें. त्याच्यावर वर्तमानपत्रांतून चर्चा झाली, ग्रंथ निर्माण झाले. लोकांच्या जीवनांत ती नित्याची गोष्ट होऊन गेली. मग कवींना शेतकरी दिसूं लागला. त्याची फाटकी वाकळ त्यांच्या हृदयाला सलूं लागली, त्याचें निष्पाप जीवन त्यांना आवडूं लागलें. आणि मग आपल्या खोलींतच बसून कोणी भाताच्या खाचरांत जाऊन येऊं लागले, कोणाला इरलेवाली भेटूं लागली, कोणी जंगलचें पांखरू झाले. आणि त्यानंतर गुराखी, पाटीवाली, मोळीवाला, कोळी, यांचें नशीब उदयाला आलें. आंदोलनांच्या नंतर जरी आमच्या कवींना त्याचें आकलन झालें असतें तरी चंपारण्य, जालियनवाला, दांडी, आठ ऑगस्ट यांवर त्यांनी महाकाव्यें निर्माण केलीं असतीं. पंजाबचें हत्याकांड, बंगालची उपासमार, यांचा खरा अर्थ लोकांना सांगितला असता आणि आतां सध्या भारतात ज्या भिन्न शक्तींचा संघर्ष चालू आहे व ज्यांच्यातून तिचें भवितव्य ठरावयाचें आहे त्यांना मूर्तरूप देऊन त्यांतून रम्य असें महाभारत निर्माण केलें असतें. पण त्यांना ती ऐपतच नाही. त्याला ते काय करणार ?

बंगालच्या उपासमारीचा खरा अर्थ सांगावयाचा, दांडी प्रयाणावर महाकाव्य रचावयाचें किंवा सध्याच्या भिन्न आर्थिक प्रेरणांची मीमांसा करावयाची तर त्याचे परिणाम भोगण्याची तयारी पाहिजे. ती आमच्या कवींची नाही. आणि कादंबरीनाटककारांचीहि नाही. यामुळेच मराठींतील ललितेतर गद्य साहित्याची, वृत्तपत्रीय वाङ्मयाची, निबंध व तात्त्विक ग्रंथ यांची महती वाटूं लागते, व त्या साहित्यिकांचे आपण किती ऋणी आहों याची कल्पना येते. आपलें वाङ्मय जप्त झालें तरी, आपणांस तुरुंगवास आला तरी पुनश्च हरिः ॐ करावयाचेंच हें त्यांचें ठरलेलें होतें. आणि असा प्रसंग दहा मैलांवरूनच टाळावयाचा हें कवींचें ठरलें होतें. शिवरामपंतांचें धोरण अवलंबणाराहि कोणी कवि झाला नाही. एकदा तुरुंगवास आल्यावर त्यांनी आपलें काळ–लेखन बंद ठेविलें. तेवढें धैर्य जरी कवींनी दाखविलें असतें, आपल्या प्रिय काव्यदेवतेसाठी एकदा तरी कारावास सोसावयाचाच असें कोणी कवींनी ठरविलें असतें तरी जालियनवाला, चंपारण्य, दांडी अशीं महाकाव्यें मराठींत अवतीर्ण झालीं असतीं. पण आमचे कवि लहान आहेत, नाजुक आहेत, संघर्ष त्यांना सोसत नाही. म्हणून त्यांनी नेमस्त धोरणच अंगीकारलें होतें.

अजून सुद्धा इतरांनी निर्माण केलेल्या विचारांचे कांही पडसाद निर्माण करण्यापलीकडे त्यांना जास्त कांही करतां येत नाही. जगांतले विचारप्रवाह स्वतः जाणून ते प्रथम सांगावे, आपण त्यांचा आपल्या भावप्रबलवाणीनें प्रथम प्रसार करावा हें सामर्थ्य त्यांना नाही. गद्यलेखकांनी निबंध लिहिले, ग्रंथ प्रकाशित केले म्हणजे मग बऱ्याच काळाने त्यांना त्यांतलें कांही समजतें व मग ते त्यांतून कांही उसनवारी करून पद्यरचना करतात.

प्रत्येक कवीला कांही अभिजात, स्वतंत्र, मौलिक विचार सुचला पाहिजे असा हा आग्रह नाही; पण तें सोडून दिलें तरी किती तरी अपेक्षा शिल्लक राहतात. भाऊ महाजन पासून आजपर्यंतचे गद्य लेखक पाहिले तर त्यांनी आपल्या क्षेत्रांतल्या अपेक्षा बऱ्याच पुऱ्या केल्या आहेत असें दिसतें. ज्ञानाचा प्रसार, तत्त्वज्ञानाचें प्रतिपादन, पांडित्य, संशोधन, खंडनमंडन, यांत पुष्कळच उंची गद्यलेखकांनी निर्माण केली आहे. आधुनिक भारत, विज्ञानबोध, संस्कृतिसंगम, यांसारखे ग्रंथ आणि प्रत्यहीं मासिकांतून आढळून येणारें इतर लेखन पाहिलें म्हणजे मराठी गद्याचें वैभव आजहि पूर्ण समाधानकारक नसलें तरी, आशादायक आहे

असें निश्चित वाटतें. त्याच्या तुलनेनें एकंदर ललितवाङ्मयच फार खालीं आहे. आणि काव्य म्हणजे पद्य हें तर कोठे नाहींच असें वाटतें.

म्हणजे, गेल्या शंभर सवाशे वर्षांतील काव्य पाहिलें तर वर्तमानकालाचें आकलन, भविष्यकालाचें दर्शन, मार्गक्रमणाची मीमांसा, तिकडे पाऊल टाकण्याची हिंमत, त्यासाठीं लागणारें नेतृत्व, त्याची तपश्चर्या, त्याप्रीत्यर्थ हालअपेष्टा भोगण्याची तयारी हें जें कांहीं सरस्वतीचें, वाणीचें, लेखणीचें वैभव तें अल्पांशानेंहि आमच्या कवि लोकांत नाहीं. मात्र आपलें तें स्थान आहे, आपण त्याच कार्यासाठीं जन्मलों आहों, असा अभिमान मात्र ते बाळगतात. जीवनाला आपल्यामुळे समृद्धि येते अशी त्यांची कल्पना आहे. राष्ट्रविकासांत आपल्याला स्थान आहे, असा त्यांना आत्मविश्वास वाटतो आणि यामुळेच गद्यपद्याची तुलना करावी असें वाटूं लागतें. नाहीतर या फंदांत आम्ही कशाला पडलों असतों ?

घरांत कांहीं शुभ अशुभ घटना घडत असतात. कधीं लग्नकार्य असतें तर कधी मृत्यु असतो. पण लहान मुलांना त्यांतील कारणें गम्य नसतें. तीं आपलीं धावण्यांत, उड्या मारण्यांत दंग असतात. मधून मधून मोठ्या माणसांच्या चर्या पाहून बऱ्यावाईट चर्या तींहि करतात. पण एकंदरींत त्यांना या घटनांत कांहीं स्वारस्य नसतें हेंच खरें. या घटनांचा परिणाम त्यांच्यावर घडल्यावाचून राहत नाहीं हें निश्चित. पण त्यांना त्यांचें आकलनच होत नाहीं. तसें गेल्या शतकांतील कवींचें आहे असें वाटतें. विष्णुशास्त्री, टिळक, आगरकर, राजवाडे, वैद्य, केतकर, केळकर, परांजपे, वा. म. जोशी, जावडेकर, सावरकर, प्रा. माटे, हीं मराठीच्या संसारांतील मोठीं कर्तीं माणसें आहेत. आणि यांच्या नेतृत्वाखालीं अनेक नवे लेखक तेंच कार्य पुढे चालवीत आहेत. तें पाहून वर म्हटल्याप्रमाणें या संसाराविषयीं बरीच आशा वाटते. पण कवि लोकांचा विचार केला म्हणजे त्यांच्याकडे उगीच मध्ये कौतुकानें पाहावें आणि पुन्हा आपल्या कामाला लागावें यापलीकडे त्यांत विशेष तात्पर्य नाहीं असा विचार मनांत येतो.

---

## नवीन सामाजिक प्रयोगांविषयीं डॉ. केतकरांचें मत—

" नवे नवे सामाजिक प्रयोग करण्याची हिंदुस्थानांत आवश्यकता आहे. पाश्चात्य प्रयोगांपासून आपणांस कितपत फायदा घेतां येईल याविषयीं बराच संशय आहे. पाश्चात्यांची व आपली समाजस्थिति अनेक बाबतींत भिन्न आहे. व यासाठीं त्यांच्या देशांत एखाद्या शासनाचे जे परिणाम होतील, ते आपल्या देशांत होतीलच असें नाहीं. आपण प्रयोगाखातर जे कांहीं कायदे पुढे आणूं ते देखील विचारपूर्वक आणले पाहिजेत. कारण अविचारानें प्रयोग होतां कामा नये... आपल्या देशांतील परिस्थितीचा अभ्यास करून समाजसुधारणेस जी जागा दिसेल, तिचाच उपयोग केला पाहिजे. "

(' संकीर्ण लेख ', पृ. १६२)

# दिवा विझविला—

दिवा विझविला जळजळणारा
अन् पूर्वेच्या खिडकीमधुनी
किरणांचा तर झोत पसरला
कण कण चांदी देत फेकुनी—

कडुनिंबाच्या झाडामागुन
हासत होता पूर्णचंद्रमा
विरळ पांढऱ्या आत्मप्रभेची
सभोंवतालीं घेउनि सुषमा

चंद्र पाहिला असेल मागे
किती जणांनी—मींहि—कितीदा—
परी 'आजचा' पूर्णचंद्र हा
मजला कांहीं नवाच गमला !

—जननान्तरिंचा काय मित्र हा
क्षणभर मजला भेटुन गेला,
कडुनिंबांच्या मागुन येउन
हात गळ्यामधि घालुन गेला !!

—त्रि. म. कुलकर्णी

# भगवद्गीतेमधील "भाव"

लेखक—दि. के. बेडेकर

'भाव' हा शब्द भगवद्गीतेमध्ये अनेकदा आला आहे. अध्याय ७ व १० मध्ये हा शब्द वारंवार आला असून अध्याय १०.६ या श्लोकांत ईश्वराच्या 'मानस भावां'चा उल्लेख आहे. मराठीमध्ये 'भाव' किंवा 'भावना' यांचा अर्थ मनुष्याच्या भयशोकादि भावना असा रूढ आहे. भगवद्गीतेंतील 'भाव' शब्द आणि मराठी 'भावना' यांच्यांत संबंध काय आहे हें पाहणें या शब्दांच्या अर्थविकासाचें स्वरूप ठरविण्याच्या दृष्टीने उपयुक्त होईल.

दहाव्या अध्यायांतील 'मानस भावां'कडे येण्यापूर्वी प्रथम सातव्या अध्यायांतील 'भाव' शब्दाला काय अर्थ आहे तें पाहूं. जगांतील सजीव आणि निर्जीव असे सर्व पदार्थ माझ्यामध्येच आहेत (मयि सर्वमिदं प्रोतं) असें ७ व्या श्लोकांत सांगून पुन्हा १२ व्या श्लोकांत सर्व जग माझ्यापासूनच झालें आहे (मत्त एवेति तान्विद्धि) असें श्रीकृष्णांनी सांगितलें आहे. ७ व्या आणि १२ व्या श्लोकांच्या मधील श्लोकांत निरनिराळ्या पदार्थांमधील सारभूत अशा तत्त्वांचा निर्देश आहे. उदाहरणार्थ, सर्व द्रवांमध्ये मी 'रस' आहें, वेदांमध्ये 'प्रणव' आहें, नरांमध्यें 'पौरुष' आहें असें वर्णन आहे. सर्व पदार्थ ईश्वरामध्येच आहेत किंवा ईश्वरापासून झालेले आहेत याचा भावार्थ स्पष्ट करण्यासाठी मधील चारपांच श्लोकांतील वर्णन आहे, हें उघड आहे.

नाना पदार्थांची सृष्टि ईश्वरांतच आहे, या सूत्राचा अर्थ तत्त्वज्ञानाच्या प्राचीन कल्पनांना धरून लावण्यासाठी त्रिगुणांच्या कल्पनेचा आधार घ्यावा लागतो. वेगवेगळ्या पदार्थांमध्ये 'रस', 'तेज', 'पौरुष' इत्यादि जीं सारभूत प्राणतत्त्वें आहेत त्यांनाच सात्त्विक, राजस व तामस अशा तीन जातींच्या भावांमध्यें सामावतां येते, असा बाराव्या श्लोकाचा अर्थ आहे. हें सारें जग या तीन गुणांनी परिपूर्ण अशा भावांनी सिद्ध आहे, ('त्रिभिर्गुणमयैर्भावैरेभिः सर्वमिदं जगत्') असें तेराव्या श्लोकांत म्हटलें आहे.

सारांश, पदार्थसृष्टीच्या मागे **त्रिगुणात्मक** अशी एक **भावसृष्टि** आहे असा अर्थ या सर्व श्लोकांतील विवेचनाचें सूत्र तपासल्यास कळून येतो. ही भावसृष्टि म्हणजे पदार्थसृष्टीला **सारभूत** असलेल्या 'रस,' 'तेजस्' इत्यादि **भावांची सृष्टि** आहे. ईश्वरामध्ये पदार्थसृष्टि नांदते किंवा ईश्वरापासून ती विस्तारते असें कां म्हणावयाचें ? तर, भाव हींच ऐश्वर्यें, किंवा ईश्वरी सामर्थ्यें आहेत म्हणून. 'भाव' हीं पदार्थांच्या अंतर्यामीं असणारीं व प्राणभूत असणारीं प्रेरकशक्तिरूप 'सामर्थ्यें' आहेत. वस्तूंमधील विभूति किंवा ऐश्वर्य (ईश्वरी सामर्थ्य) म्हणजेच वस्तूचा 'भाव', असा अभिप्राय या तत्त्वज्ञानात्मक मांडणीमुळे स्पष्ट होतो.

यावरून आणखी एक असें दिसतें की 'भाव' हे खुद्द वस्तूंनाच 'रूप' देणारे, भावित करणारे आहेत; सिद्ध वस्तूंच्या विकारांचें, विशेषत: मनुष्यादि प्राण्यांच्या मानसिक विकारांचें, स्वरूप या त्रिगुणात्मक भावांना नाही. मराठींत रूढ झालेली 'भाव' ही संज्ञा आणि गीतेंतील 'भाव' यांमध्ये केवढी तफावत पडली आहे !

आतां, दहाव्या अध्यायांतील 'मानस भावां'चा विचार करूं. या उल्लेखावरून 'भाव' याचा अर्थ मानसिक भावना असाच गीतेंत (या ठिकाणीं तरी) मानलेला आहे असें म्हणता येतें कीं नाही ? उलट, भावांना 'मानसाः' हें विशेषण कवीने लावलें यावरूनच स्पष्ट दिसतें की 'भाव' हे सामान्यतः मानस कोटींतील मानले जात नव्हते. 'मानसपुत्र' या शब्दांत पुत्र या संज्ञेला जसा अ-मानसच अर्थ आहे, तोच न्याय मानस-भावांना लागू आहे. या श्लोकांत सांगितलेले मानस-भाव ईश्वराचे तरी मानसिक विकार आहेत का? मुळींच नाही. सात ऋषी, वासुदेवादि 'चतुर्व्यूह' आणि सात मनु या अठरा विभूतींना भाव ही संज्ञा येथे योजिली आहे. ( रहस्य-संजीवन, पान २१७ पाहा. )

ईश्वराने सृष्टि निर्माण केली ती सरळ स्वतःच बनविली नाही, तर या 'भावां'च्या मध्यस्थीने किंवा माध्यमानें हे सृजनकर्म घडलें, असें 'भावांचें' कार्य या ठिकाणीं आपल्याला दिसून येतें. 'भाव' म्हणजे शक्तिरूप अशीं सामर्थ्यें किंवा विभूती आहेत; व मनुष्याला ईश्वराचें अंतिम कर्तृत्व दिसण्यापूर्वी या भावांचेंच कर्तृत्व दिसतें, असा वरील श्लोकाचा अर्थ ज्ञानेश्वरांनी लावलेला आहे.

'तैसें मीं एकचि पहिलें।
मग मी तेंचि मनातें व्यालें।
तेथ सप्तऋषि जाले।
आणि चारी मनु॥
इहीं लोकपाळ केले।
लोकपाळीं विविध लोक सृजिले।
लोकांपासूनि निपजले।
प्राणिजात॥
ऐसेनि हें विश्व येथें।
मींचि विस्तारिलें निरुतें।
परि भावाचेनि हातें।
माने जया'॥

(अध्याय १०, ओव्या १०१, १०२, १०३)

विश्व हें ज्यांना मानतें अशा ऋषींना व मनूंना 'भाव' ही संज्ञा गीतेमध्ये वापरली आहे, हीच गोष्ट ज्ञानेश्वरांच्या विवेचनावरूनहि दिसते.

## 'भावना' हा शब्द केव्हां आला ?

सारांश, अगदी प्राचीन काळापासून पाहिलें तर 'भाव' या शब्दाला 'मानसिक' भावना हा अर्थ नव्हता असें दिसतें. भरत मुनींच्या नाट्यशास्त्रांत रसभावविकल्पनाची चर्चा आहे. तेथेंहि 'भाव' म्हणजे भावना असा अर्थ लागत नसून 'भाव' ही संज्ञा रसाभिव्यक्तीला कारणीभूत ठरणाऱ्या प्रमेयात्मक अशा नाट्यवस्तूंना ( रतिशोकादि आठ स्थायिभावांना व

इतर एकेचाळीस भावांना ) लावलेली आहे.* आयुर्वेदाच्या व तत्त्वज्ञानाच्या क्षेत्रांतहि 'भाव' हा शब्द वापरला गेला असून तो मनोविकार या अर्थी वापरलेला नाही.

यावरून प्रश्न असा उत्पन्न होतो की, 'भाव' किंवा 'भावना' म्हणजे मनोविकार ही मराठी भाषेतील रुढ अर्थाची परंपरा नेमकी केव्हा व कशी निर्माण झाली ? आजहि, क्षय-रोगाची अमक्याला 'भावना' झाली आहे असें वैद्य म्हणतात. यावरून प्राचीन संस्कृत अर्थाचा हा अवशेष मराठींत डोकावतो. पण अवशेष सोडले तर त्या संज्ञेचा अर्थ पार बदलला आहे असें दिसतें. ज्ञानेश्वरांच्या काळीं देखील 'भाव' म्हणजे 'मनोविकार' हें समीकरण मराठींत दृढ व रूढ झालें नसावें असें 'मानसा मावा'वरील ज्ञानेश्वरांच्या टीकेवरून वाटतें. पण, हें एखाद्या उल्लेखावरून ठरविणें गैरच आहे.

प्राचीन तत्त्वज्ञानाच्या चर्चेत 'मन' हें एक सहावें, आंतलें इंद्रियच (अंतःकरण) मानलें गेलें होतें, आणि इतर इंद्रियांप्रमाणें बाह्यार्थामुळें तें विकार पावतें असें मानलें जात असे. भय, क्रोध, रति इत्यादि मनाचे विकार मानले जात. 'चित्तवृत्ति' हा शब्दहि 'मनोविकारा' सारखाच वापरला जाई. मराठींतहि 'भावना' हा शब्द न वापरतां मनोविकार किंवा चित्त-वृत्ति हे शब्दच वापरणें शक्य आहे व प्रत्यक्ष हेच शब्द वापरले जातातहि जुन्या लोक–गीतादि वाङ्मयांत किंवा वृध्दांच्या भाषेत अजूनहि 'भावना' या शब्दाऐवजीं मनोविकार किंवा वृत्ति हे शब्दच जास्त आढळून येतात.

इंग्रजीशीं घसट झाल्यावर, इंग्रजींत इमोशन, सेन्सेशन, इत्यादि ज्या मानसशास्त्रीय परिभाषेतील व्यवच्छेदक संज्ञा आहेत, त्यांना पर्यायवाची संज्ञा योजतांना 'मनोविकार' किंवा 'चित्तवृत्ति' ही जुनी सर्वव्यापक संज्ञा अपुरी पडली व इंद्रियानुभूति, भावना, इत्यादि शब्द बनविले गेले, अशी एक घटना संभवते. या नव्या बनावटीच्या काळांत ' उत्क्रांति ' यासारखे शब्द रूढ झाले. पण ' भावना ' शब्दाला मनोविकार या अर्थाची थोडी परंपरा असण्याचीहि शक्यता आहे. ती परंपरा किती मागे जाते ? जन्मजन्मांतरींच्या संस्कारांना 'भावस्थिराणि' असें विशेषण कालिदास देतो, त्या अनुसंधानाने 'संस्कारां'च्या मागोमाग जात 'भाव' हे शेवटीं मराठींत मनोविकार बनले असतील असें म्हणतां येईल का ?

संस्कृतमधून मराठींत आलेल्या अशा शब्दांचा ह्या ' भाषांतरा 'च्या वेळीं होणारा अर्थविपर्यय तपासणें मनोरंजक ठरेल. शिवाय त्यावरून तत्त्वज्ञानाच्या क्षेत्रांतील विचार-संक्रमणाच्या बाबतींतहि उपयुक्त निष्कर्ष काढतां येतील. ' भाव ' या शब्दासंबंधीं असा तपास करणें शक्य आहे व तो उपयुक्त ठरण्याचा संभव आहे, एवढेंच मला सुचवावयाचें आहे.

' भाव ' या शब्दाप्रमाणेच ' कल्पना ' या शब्दाचा मूळ संस्कृत अर्थ आणि मराठी अर्थ यांत तफावत पडलेली आहे असें मला वाटतें. मनाच्या व बुद्धीच्या व्यापाराविषयींच्या संज्ञांमध्येच अशी तफावत पडलेली आहे का ? ही तफावत नवव्या दहाव्या शतकांतील देश-भाषांच्या विकासाच्या वेळीं पडली की अलीकडे इंग्रजीच्या आघातानंतर पडली ? असे प्रश्न या अनुषंगाने विचारांत घ्यावेत असें मला वाटतें.

---

* रससिद्धान्ताची चर्चा करितांना ह्या नाट्यभावांचें विवेचन मीं विस्ताराने केलें आहे, तें 'नवभारत'च्या ऑक्टोबरच्या अंकांत प्रसिद्ध झालें आहे.

हिंदींतील एक अमर कलाकृति

# प्रेमचंदांचें 'गोदान'

लेखक—प्रा. प्र. रा. भुपटकर, एम्. ए.

स्व. सानेगुरुजींच्या आत्मार्पणानंतर त्यांचें स्मारक करण्याच्या उद्देशाने त्यांनीच स्वतः पुरस्कारिलेल्या 'आंतरभारती'च्या कल्पनेला जोरानें चालना देऊन गुरुजींचें तें स्वप्न साकार करण्याकरिता समिति व तिच्या शाखोपशाखा स्थापन झाल्या असून निधि गोळा करण्याचें कार्य चालू झालेलें आहे. 'आंतरभारती'च्या ज्या भिन्न प्रवृत्ति कल्पिलेल्या आहेत त्यांतील एक महत्त्वाची प्रवृत्ति म्हणजे भिन्न भाषांतील साहित्याशीं परिचय करून घेऊन त्याच्या द्वारें त्या त्या समाजजीवनाची ओळख करून घेणें ही आहे. या ओळखीचें पर्यवसान आत्मीयतेंत होणार असून त्यायोगेंच भारताच्या सांस्कृतिक एकतेचा प्रत्यय जनतेस येणार आहे.

भारत हें बहुभाषी राष्ट्र असल्यामुळे त्याला स्वतःची अशी राष्ट्रभाषा असावी व तिचा प्रचार व प्रसार होऊन इंग्रजीची भाषिक गुलामी नष्ट व्हावी या हेतूने सुरू झालेल्या राष्ट्रभाषाप्रचाराच्या आंदोलनाच्या मुळाशीं देखील वरील परिच्छेदांत उल्लेखिलेलाच हेतु होता. हिंदी भाषा नसलेल्या प्रांतांमधून राष्ट्रभाषाप्रचारास कांही ठिकाणीं १९१८ मध्ये तर कांही ठिकाणीं १९३७ मध्ये सुरवात झाली. गेल्या वर्षी भारतीय संघराज्याने 'हिंदी' ही आपली राज्यभाषा घोषित केल्याने अर्थातच या आंदोलनाला एक नवीन बळ प्राप्त झालें. आतांपर्यंतचीं वर्षें हीं हिंदी भाषा शिकविण्यांतच खर्च झाल्यामुळे साहित्यिक आदान-प्रदानाचें अंग थोडेसें उपेक्षितच राहिलेलें आहे. परंतु आतां केवळ भाषेचा प्रचार करून भागणार नाही, तर साहित्याचाहि प्रचार केला पाहिजे. हिंदी ही आतां राष्ट्रभाषा झालेली असल्यामुळे हिंदी साहित्याचा अधिकारयुक्त परिचय हें आतां प्रत्येक भारतीयाचें प्राप्त कर्तव्य होऊन बसलेलें आहे. याच दृष्टीने आज हिंदीचे आधुनिक युगांतील सर्वांत प्रसिद्ध व सर्वांना सुपरिचित असे लेखक उपन्याससम्राट स्व. प्रेमचंद यांच्या एका कलाकृतीचा परिचय या लेखाच्या द्वारें करून देण्याचें योजिलेलें आहे.

हा लेख लिहिण्यासाठीं प्रेरित होण्यास आणखीहि एक कारण झालें. ज्या वेळीं हिंदीच राष्ट्रभाषा म्हणून कां स्वीकारावी याबद्दल बोलण्याचा प्रसंग येई त्या वेळीं आम्ही राष्ट्रभाषेचे प्रचारक असें सांगत होतों की, हिंदीचा राष्ट्रभाषा म्हणून जो स्वीकार केला जातो त्याचें कारण तिचें साहित्य समृद्ध आहे हें नसून ती भारतामध्यें सर्वांत अधिक लोक बोलतात हें आहे. प्रचारामध्यें या वाक्याची वारंवार पुनरावृत्ति झाल्यामुळे कांही मंडळींमध्ये असाहि

भ्रम निर्माण झालेला आहे की, हिंदीमध्ये कांही साहित्यच नाही. हाहि भ्रम शक्य झाल्यास दूर करण्याचा प्रयत्न करावा या बुद्धीने हा लेख लिहिण्याचें धाडस करीत आहे.

ज्या वेळीं हिंदीमध्यें साहित्य नाही असें म्हणतात त्या वेळीं म्हणणारांचा हेतु एवढाच असतो कीं अन्यप्रान्तीय भाषांच्या–विशेषतः उन्नत व प्रगतिशील गुजराती, मराठी, बंगाली यांच्या–तुलनेने हिंदीमधील सर्वसामान्य साहित्य तितक्या उच्च प्रकारचें नाही. याचा अर्थ असा नाही की हिंदीमध्यें साहित्यच नाही. उलट मी तर असें म्हणावयाचें देखील धाडस करीन की हिंदींतील स्व. प्रेमचंद, प्रसाद, मैथिलीशरणगुप्त, महादेवी वर्मा, सुमित्रानंदन पन्त, यशपाल इत्यादींची बरोबरी करणें फारच थोड्या अन्यप्रान्तीय साहित्यिकांना जमेल.

प्रेमचंदांना हिंदी आलोचक उपन्याससम्राट मानतात, व तें खरेंहि आहे. त्यांनी कादंबऱ्या व लघुकथाहि लिहिलेल्या आहेत व दोन्ही क्षेत्रांत ते अमर व अद्वितीय आहेत. हे दोन्ही वाङ्मयप्रकार त्यांनी आपल्या लेखणीनें इतक्या उच्च स्तरावर नेऊन पोंचविले आहेत कीं त्यांच्यानंतर दुसऱ्या कोणाचें नांव घ्यावें हा एक अडचणींत टाकणारा प्रश्न होऊन बसतो. प्रेमचंद हे जीवनवादी कलाकार होते. जीवनाचें कल्याण व त्याकरितां जागृति हींच त्यांचीं दोन कलाप्रयोजनें होतीं. त्यांच्या कादंबऱ्या आणि गोष्टी या दोहोंचे विषय ग्रामीण जीवनांतून घेतलेले आहेत. ग्रामीण व शोषित जनतेच्या जीवनाच्या साहित्यिक प्रतिबिंबाचें आदर्श स्वरूप प्रेमचंदांच्या लिखाणांत आढळतें. म्हणूनच हिंदी आलोचकांनी प्रेमचंदांबद्दल लिहितांना म्हटलें आहे की, ' वह गरीब की आह सुनते हैं और उसको वाह बना देते हैं । ' शहरी आयुष्य हें कृत्रिमतेने व दिखाऊपणाने भरलेलें आहे; ज्याच्याजवळ जितका पैसा अधिक तितका तो अधिक नीच ही त्यांची श्रद्धा होती. व म्हणूनच खेडेगांवांतील हीन दीन जनतेची विवशता पाहून त्यांचें मन द्रवत असे व या रंजल्या गांजलेल्या मूक जनतेच्या दुःखाला वाचा प्राप्त करून देणें हेंच त्यांनी आपलें जीवनकार्य ठरविलें होतें.

'गोदान' ही प्रेमचंदांची अंतिम कादंबरी होय. या कादंबरीचा विषय शेतकऱ्याची दुर्दशा हा आहे. कादंबरीचा नायक होरी हा उत्तर प्रदेशांतील एका खेडेगांवांतील शेतकरी आहे. स्वतःची चारपांच बिघे जमीन असून स्वतःच्या मेहनतीने तो अब्रूने दिवस कंठीत आहे. त्याच्या बायकोचे नांव धनिया. एक मुलगा गोबर, दोन मुली रूपा व सोना. दोन भाऊ हीरा व सोभा. प्रारंभीं हा परिवार एकत्र होता. होरीनें व धनियाने हीरा व सोभा यांचें पुत्रवत् पालन केलें. परंतु भावांच्या बायका घरांत आल्या, भावांनाहि कान फुटले, मिळकतीचें वांटप झालें आणि तिघे भाऊ निरनिराळे राहूं लागले व आपापली शेती स्वतंत्रपणें करूं लागले. या फुटीमुळे फायदा कोणाचाच झाला नाही; उलट प्रत्येकाची आर्थिक स्थिति मात्र खालावत गेली.

या आर्थिक विषमतेच्या परिस्थितींत गोगलगाय बनून जितकें जीवनसुख मिळवितां येईल तेवढें मिळवावें हा होरीचा जीवननियम बनून गेला होता. सर्वसामान्य शेतकऱ्याप्रमाणें आपल्याजवळहि एक गाय असावी व तिच्या दूधदुभत्यावर आपल्या मुलाबाळांनी हृष्टपुष्ट व्हावें ही त्याची सर्वांत उत्कट अभिलाषा होती. आपल्या दरवाज्याशीं बांधलेली गाय हेंच त्याचें जीवनांतलें एकमेव सुखस्वप्न होतें. शेजारच्या खेडेगांवचा गवळी भोला यानें ८० रुपयांस अशी एक गाय होरीला विकली. अर्थात सौदा उधारीचा होता. परंतु भोलाला भुशाची आवश्यकता होती आणि त्यांतून भोलासारख्या विधुराला सुंदर पोरगी पाहून देण्याचें आश्वासन होरीने दिलेलें असल्यामुळे हा व्यवहार जमून आला.

या गाईच्या निमित्तानेच होरीचा मुलगा गोबर व भोला गवळयाची तरूण विधवा मुलगी झुनिया यांची ओळख घडून आली. या ओळखीचें पर्यवसान प्रेमांत झालें आणि प्रेमाची परिणति म्हणून झुनियाला दिवस गेले.

ही गाय ज्या दिवशीं होरीच्या घरीं आणून बांधली त्या दिवशीं सारें गांव गाय पाहायला धावलें. परंतु होरीचे दोन्ही भाऊ मात्र गाय पाहावयाला आले नाहींत. त्यांच्या मनाने घेतले कीं होरीने बापाच्या वेळचा पैसा दाबून ठेवलेला असला पाहिजे. नाहीतर ८० रुपयांस गाय घेण्याचें धाडस होरीच्या हातून कसचें होतें? भाऊबंदकीच्या द्वेषाने प्रेरित होऊन हीराने गाईला विष खावयास घातलें आणि गाय मेली. होरीवर दुःखाचा डोंगर कोसळला.

झुनियाच्या गर्भावस्थेची सूचना मिळतांच जननिंदेच्या भयाने गोबर पळून गेला; आणि बापाकडून लाथाडलेली झुनिया शेवटीं आश्रयासाठी होरी व धनिया यांचेपाशीं आली. होरी व धनिया यांनी सारें जनभय बाजूला ठेवून वात्सल्याने प्रेरित होऊन झुनियाला आपल्या घरीं आश्रय दिला.

झुनियाच्या वर्तणुकीमुळे भोला चिडला. पैशाकरितां कडक मागण्या होऊं लागल्या. झुनियास आश्रय दिल्याबद्दल पंचायत झाली. होरीला आपल्या पापाचें प्रायश्चित्त म्हणून दंड द्यावा लागला. अर्थात् स्वतःजवळ पैसे नाहीत. एकाकडून कर्ज काढावयाचें व दुसऱ्याचा तगादा भागवावयाचा यापलीकडे होरी तरी अधिक काय करणार! मूळ रक्कम, तिचें अमानुष व्याज, यामुळे कर्जाची रक्कम वाढतच चालली आणि मिळकतीपैकी जमीन, बैल, घर इत्यादि वस्तु नाहीशा होत चालल्या. शेवटीं होरीला शेती सोडून रस्त्यावरची खडी फोडणारा मजूर व्हावें लागलें. उन्हाळयाचे दिवस, दुपारच्या ज्वाला चाललेल्या, आधीच वृद्धावस्थेमुळे अशक्त झालेला होरी, त्याला ही मेहनत आणि उष्णता सहन न होऊन उलू लागली व त्यांतच त्याचा अन्त झाला. इतर जमा झालेल्या लोकांनीं धनियास गोदान करावयास सांगितलें. पांच आण्यांचे पैसे जवळ होते ते होरीच्या मृत हातांत ठेवून धनियाने हा गोदानाचा संस्कार आटोपला व येथेच कादंबरीचा शेवट झालेला आहे.

वर दिलेल्या कथानकाच्या अनुरोधाने प्रेमचंदांनीं खेडेगांवांत उत्पन्न होणाऱ्या सर्व सामाजिक, आर्थिक व धार्मिक प्रश्नांना स्पर्श करून खेडेगांवाचें यथातथ्य चित्र वाचकांपुढे उभें केलेलें आहे. सरकारी अधिकाऱ्यांचा जुलूम, सावकारांचा जाच, धार्मिक समजुतींचा शेतकऱ्यांच्या मनावर बसलेला पगडा, धार्मिक श्रद्धांचा आपल्या स्वार्थाकरितां वापर करणारे ब्राह्मण, तथाकथित उच्चवर्णीयांची स्त्रीसंबंधविषयक नीति, जमीनदार आणि जमीन कसणारीं कुळें यांचे संबंध, पुनर्विवाह, जरठकुमारी विवाह, ग्रामीण जनतेमध्ये शहराकडे धाव घेण्याची दिसून येत असलेली वृत्ति इत्यादि शेतकरी जीवनाला व्यापून टाकणाऱ्या सर्व प्रश्नांना प्रेमचंदांनी हात घातलेला आहे.

एका गोष्टीचा उल्लेख करणें आवश्यक वाटतें. ती गोष्ट अशी की, जरी या सर्व प्रश्नांचा अन्तर्भाव प्रेमचंदांनी आपल्या कादंबरींत केला असला तरी या प्रश्नांची सोडवणूक कोणत्या प्रकारें करावी याचें दिग्दर्शन मात्र त्यांनी कोणत्याहि प्रकाराने केलेलें नाही. अर्थात् तशी अपेक्षा करणेंहि व्यर्थ होईल. किंबहुना, आजची विचारधारा याच प्रकारची आहे की, लेखकाने केवळ प्रश्न निर्माण करावेत, प्रश्न सोडविण्याचें उत्तरदायित्व लेखकावर नाही. परंतु प्रेमचंद स्वतः मात्र या विचारधारेशीं तितकेसे सहमत नव्हते. आणि म्हणूनच त्यांनीं ही

'गोदान'सारखी अंतहीन कादंबरी कशी लिहिली याचें आश्चर्य वाटतें. परंतु ज्यांनी प्रेमचंदांच्या कृतींचें एका विशिष्ट क्रमानें अध्ययन केलेलें आहे त्यांना यांत आश्चर्य वाटणार नाही. थोडेसें स्पष्टीकरण केलें म्हणजे माझा मुद्दा स्पष्ट होईल. ग्रामीण जनतेच्या प्रश्नांवरील प्रेमचंदांची ही दुसरी कादंबरी आहे. 'प्रेमाश्रम' या कादंबरीचा विषयहि शेतकऱ्यांची समस्या हाच होता; व तिच्यामध्ये शेतकऱ्यांची परिस्थिति सुधारण्याचा तोडगा म्हणून जमीनदारांचें हृदयपरिवर्तन हा मार्ग सुचविण्यांत आला होता. त्यानंतर प्रेमचंदांच्या विचारांवर मार्क्सवादी विचारसरणीचा प्रभाव जास्त जास्त होऊं लागला व त्यांना व्यक्तिगत प्रयत्नांची विफलता दिसून आली. 'गोदान'मध्ये त्यांनी विद्रोहाचीं बीजें गोबरच्या चरित्रांत घालून ठेवलेलीं आहेत. परंतु गोबरला देखील सफलता न मिळूं देण्याचा हेतु हाच असावा असें वाटतें की, एकट्या दुकट्या माणसाच्या प्रयत्नाने जमीनदारी ही संस्था नष्ट होणार नाही. संघटित, सामूहिक शक्ति हाच क्रांतीचा मार्ग आहे. ही क्रान्ति सर्वव्यापक व्हावी, जीवनाचे मिथ्या आदर्श व असत्य सिद्धान्त यांचा लोप व्हावा, व एक नवीन जगत् निर्माण व्हावें, याबद्दलच्या सांकेतिक प्रेरणा कादंबरींत ठिकठिकाणीं विखुरलेल्या आढळतात.

तंत्रनिष्ठ रसिकांना कदाचित् या कादंबरींत कांही दोष आढळण्याचा संभव आहे. परंतु मी असें आश्वासन देऊं इच्छितों की कादंबरी वाचीत असतांना यांपैकीं एकहि दोष आपणांस खटकणार नाही. इतका प्रभाव प्रेमचंदाच्या लेखणींत आहे. दुसरें असें की, तंत्रापेक्षां मंत्राला, जीवनविषयक संदेशालाच शेवटीं महत्त्व द्यावें लागतें. कारण जर जीवनविषयक संदेश नसेल तर तंत्रबद्धता म्हणजे प्रेताचाच शृंगार, दुसरें काय ? प्रेमचंदांच्या लिखाणामधील सर्वांत मोठा आकर्षक प्रभाव जर कशाचा असेल तर त्यांनी जें लिहिलें तें अनुभवांतीं लिहिलें असल्यामुळें त्यांत आम्हांस सत्यतेचा प्रत्यय येतो या गोष्टीचा.

प्रेमचंदांचा दुसरा विशेष म्हणजे त्यांची वाङ्मयीन महात्मता. त्यांचें साहित्य जर कोणत्या एका गुणामुळे विलोभनीय झालेलें असेल तर तें दलितांच्या, पीडितांच्या, शोषितांच्या बद्दल त्यांच्या ठिकाणीं असलेल्या विशाल सहानुभूतीमुळे, हृदयाच्या मोठेपणामुळे. हा हृदयाचा मोठेपणा, ही विशाल सहानुभूति असल्यामुळेच प्रेमचंद या शोषित जनतेशीं एकरूप होऊं शकले आणि यामुळेच आदर्श ग्रामीणांचें साहित्य ते निर्माण करूं शकले. आणि नेमक्या याच दोन गोष्टींच्या अभावीं आमचें आजचें साहित्य बहुतांशीं जर्जर झालेलें दिसून येतें.

---

# हिंदीच्या क्षेत्रांतील घडामोडी

लेखक—श्री. शं. दा. चितळे, एम्. ए.

**सरदार पटेल के भाषण**—( सं. नरहरि द्वा. परेख और शाह, नवजीवन प्रकाशन अहमदाबाद, पृ. संख्या ६२४, मूल्य ५ रु.) इ. स. १९१८ पासून इ. स. १९४८ पर्यंतचीं पटेलांचीं भाषणें या ग्रंथांत हिंदींत अनुवाद करून दिलेलीं आहेत. स्वतःच्या शब्दांत सरदारांचें व्यक्तित्व समजण्यास या ग्रंथाखेरीज दुसरें साधन नाही.

**यक्ष्मचिकित्सा**—( ले. डॉ. कुन्दनलाल, प्र. सेठ रतनसी हरीजी, यक्ष्मचिकित्सा सॅनिटोरियम्, जबलपूर, मूल्य रु. ४॥ ) आपल्या अनुभवाच्या व ज्ञानाच्या आधारें क्षयरोग कसा बरा करतां येईल याचा विचार लेखकाने या ग्रंथांत केला आहे.

**वत्सराज**—( ऐतिहासिक नाटक, ले. पं. लक्ष्मीनारायण मिश्र, प्र. हिन्दी भवन, ४९ टागोर टाऊन, अहमदाबाद, मूल्य रु. २ ) श्री. मिश्रजी हे प्रतिभाशाली नाटककार म्हणून प्रसिद्ध आहेत. वत्सराज उदयनाच्या कथेच्या द्वारें बौद्ध सिद्धान्ताचा अव्यावहारिकपणा लेखकाने या नाटकांत दर्शविला आहे.

**काश्मीर देश व संस्कृति**—( ले. शिवदानसिंह चौहान, प्रकाशक—राजकमल प्रकाशन, दिल्ली मूल्य रु. ५ ) काश्मीर या महत्त्वाच्या विषयावरील या पुस्तकाने हिंदी वाङ्मयांत चांगली भर टाकली आहे. कांहीं उणीवा असल्या तरी काश्मीरचा प्रश्न कळण्यास या ग्रंथाचा चांगला उपयोग होईल.

**स्मृतिकण**—( ले. सीताराम सेकसरिया प्र. आधुनिक पुस्तक-भवन, कलकत्ता; मूल्य रु. १॥ ) या पुस्तकांत म. गांधी, रवींद्रनाथ, डॉ. कर्वे, महादेवभाओी इत्यादींचीं व्यक्तिचित्रें आहेत. त्याचप्रमाणें समाजांतील उपेक्षित वर्गांतील सामान्य व्यक्तींचीं चित्रें सहानुभूतीने काढलेलीं आहेत. सोपी भाषा, मार्मिक शैली व भावनांची कोमलता हें या पुस्तकाचें वैशिष्ट्य होय.

**हिन्दी गद्य का निर्माण**—( ले. चन्द्रशर्मा पांडे, प्र. पुण्याश्रम, काशी, मूल्य १ रु. ) हिंदी साहित्य संमेलनाचे विद्वान् अध्यक्ष श्री. पांडे यांनी या ग्रंथांत संशोधनपूर्वक असें सिद्ध केलें आहे की, उर्दू गद्याच्या आधी हिन्दी भाषेमध्ये गद्य निर्माण झालेलें होतें; भाषेच्या स्वाभाविक विकासांतच ही शैली अवतीर्ण झाली; गिल्‌खिस्टसारख्या इंग्रजांनी हिंदी गद्य प्रथम निर्माण करविलें हें सत्य नाही हें ग्रंथाचें प्रतिपाद्य आहे.

**काव्यसंग्रह**—पूर्णिमा ( ले. शिशुपाल सिंह; ) माँस-विद्रोह ( गीत-नाट्य; ) गांडीव ( कवि राकेश; ) हरी घासपर क्षण-भर ( श्री. अज्ञेय; ) यथार्थ और कल्पना ( श्री. उदय-शंकर भट्ट ) इ.

एकांकिकांचे संग्रह—तारके खंभे (ले. [illegible]न्द्रशरत्); समरचाका अंत (ले. उदयशंकर भट्ट) इ.

## साहित्यिक वार्ता—

सुप्रसिद्ध लोकप्रिय कवि पं. सुमित्रानंदन पंत यांना २० मे रोजीं ५० वर्षे पुरीं झालीं म्हणून त्यांचा एकावन्नावा वाढदिवस हिंदी प्रदेशांत अनेक ठिकाणीं साजरा करण्यांत आला. इ. स. १९१८ पासून आतांपर्यंत या कवीचे १२ कवितासंग्रह प्रकाशित झाले आहेत. पहिल्या संग्रहाचें नांव 'वीणा' व अगदी अलीकडील संग्रहाचें नांव 'उत्तरा' असें आहे.

— उत्तर प्रदेश सरकारने इ. स. १९४७ मध्ये नेमलेल्या देवनागरी लिपिसमितीने आपलें विवरण नुकतेंच सरकारकडे पाठविलें आहे. समितीने सुचविलेल्या योजनेप्रमाणे ११० अक्षर-अंक असून हीं अक्षरें दोन केसींत मावतील. टेलिप्रिंटरसाठीं व लाइनो टाइपसाठीं 'की बोर्ड' हि सुचविण्यांत आला आहे. 'अ'च्या बाराखडीस पाठिंबा दिलेला नाही.

— नागरी प्रचारिणी सभा व आगरा विद्यापीठ यांनी वर्तमानपत्रकार विद्यालय सुरू करण्याचें व त्या विषयाच्या परीक्षा घेऊन पदव्या देण्याचें ठरविलें आहे.

## शोकवार्ता—

साने गुरुजींच्या मृत्यूबद्दल दुःख प्रकट करणारीं स्फुटें 'वीणा', 'नया समाज' इत्यादींनी लिहिलीं आहेत. स्वामी भवानी दयाल संन्यासी हे हिंदी भाषांचे उपासक व भारताबाहेरील भारतीयांच्या अडचणी दूर करण्याचा यत्न करणारे कार्यकर्ते दि. ९ मे रोजीं स्वर्गवासी झाले.

——

"Modern technology is highly spiritual because it seeks, through human ingenuity and intelligence, to relieve human energy from the unnecessary hardships of life and provide for it the necessary conditions for the enjoyment of life. Whatever be the use man may make of the resultant comfort and leisure, the relief of suffering and hardship is in itself spiritual. We do not necessarily condemn God simply because some honest heretics were burned to death in His name",

—**Hu Shih** (Civilizations of East and West)

# — परीक्षणें —

**पावित्र्यविडंबनाचा वाद**— [ लेखकः ग. वा. कवीश्वर, एम्. ए. श्रीसयाजी साहित्यमाला, पुष्प ३०७, किंमत अडीच रुपये ]

' नीति आणि कलोपासना ' या विवाद्य विषयावर प्रा. कवीश्वरांनी सुमारें पंधरा वर्षांपूर्वी एक ग्रंथ प्रसिद्ध केला होता. त्या ग्रन्थांतील विवेचन शास्त्रीय, तर्कशुद्ध आणि मूलगामी असल्यामुळें विद्वान् समीक्षकांना तो बहुतांशीं मान्य झाला होता. त्यानंतर उण्यापुऱ्या पंधरा वर्षांनी पावित्र्य-विडंबनासारख्या महत्त्वाच्या आणि मतभिन्नतेला अवसर देणाऱ्या विषयावर त्यांनी हा ग्रन्थ लिहिला आहे. प्रचलित आणि विवाद्य विषयांवर ग्रन्थ लिहिणाऱ्या लेखकाला प्रकृत विषयाची सांगोपांग माहिती, विवेचनाचा समतोलपणा आणि अनाग्रही वृत्ति यांची जोड अवश्य असावी लागते. प्रा. कवीश्वर यांच्या लेखनांत वरील सर्व गोष्टींचा आढळ होतो; यास्तव त्यांचा हा ग्रन्थ स्वागतार्ह ठरेल यांत शंका नाही.

ग्रन्थाच्या पहिल्या दोन विभागांत त्यांनी पावित्र्य आणि विडंबन या दोन शब्दांची शास्त्रीय, तर्कशुद्ध चर्चा केली आहे. " जी गोष्ट व्यक्तीला मानवी जीविताच्या अंतिम ध्येयाकडे घेऊन जाईल, मनाची उन्नति करील आणि अधःपातापासून वाचवील, तिला पवित्र अगर सात्त्विक अशी संज्ञा " ( पा. २-३ ) त्यांनी दिली आहे. पावित्र्याच्या कल्पनेंत धर्मभावनेचा समावेश सर्वत्र केलेला आढळतो. धर्म हा इहपरलोकीं कल्याण करणारा होय अशी आपली समजूत आहे. सध्याच्या भौतिकशास्त्रांच्या युगांत कदाचित् धर्माचें पारलौकिक अंग जरी अश्रद्धेय म्हणून सोडून दिलें तरी अभ्युदयासाठी धर्मकल्पनेचा कोणत्या ना कोणत्या स्वरूपांत प्रत्येकाला स्वीकार करावा लागतोच. आचार, विचार आणि श्रद्धा या त्रयीवर अधिष्ठित असलेला धर्म मानवी जीवनाला स्थैर्य आणतो. श्रद्धा म्हणजे विशिष्ट मतांच्या सत्यत्वाविषयीं खात्री. श्रद्धा ही बुद्धिवाद आणि तर्क यांची प्रतियोगी होय असें समजणें असमंजसपणाचें द्योतक होईल. धार्मिक विषयांत श्रद्धाहीन—अश्रद्ध—असलेल्या या युगांत श्रद्धेचा विषय बदलण्यापलीकडे कोणताच पालट झालेला दिसत नाही. साम्यवादासारख्या विशिष्ट मतप्रणालीवरील किंवा एखाद्या नेत्यावरील अव्यभिचारी निष्ठा यौगिक आणि रूढ अर्थांनी श्रद्धाच होय. तेव्हा, जुन्यावर गतानुगतिकत्वाचें शिक्कामोर्तब करितांना आपणाहि त्याच गर्तेत जात नाही ना याचा विचार आधुनिकांनी अवश्य करावयास हवा. पावित्र्याच्या कल्पनेंत आधुनिक अर्थानेंहि धर्माचा अंतर्भाव होतो. म्हणून " वस्तुतः जें जें म्हणून धार्मिक असेल तें तें पवित्र होय आणि जें जें अपवित्र असेल तें तें अधार्मिक होय " हें लेखकाचें विधान मान्य होण्यास प्रत्यवाय नसावा.

पावित्र्य व्यक्तिगत आणि वस्तुगत असें दोन प्रकारचें असतें. वस्तुगत पावित्र्य हें सुद्धा अनेक व्यक्तींनी बनलेल्या समाजांतील आप्त आणि संमान्य व्यक्तींनी आदरिलेलें पावित्र्य होय. या दोन प्रकारच्या पावित्र्यकल्पनांत जेव्हां संघर्ष

उत्पन्न होईल तेव्हा वस्तुगत पावित्र्यच श्रेष्ठ मानावें लागेल. दैनंदिन व्यवहारांत एखाद्या व्यक्तीला पवित्र वाटणाऱ्या कल्पनेचें, वस्तूचें किंवा व्यक्तीचें विडंबन न करण्याची दक्षता आपण बाळगीत असतों याचें इंगित व्यक्तीच्या ठिकाणीं असणारें सौजन्य हें होय. पावित्र्याची कल्पना देश, काल, परिस्थिति आणि वाढता ज्ञानप्रसार, चिकित्सकबुद्धि यांच्या अनुषंगानें बदलते. अर्थात् प्रत्येक काळांत त्या त्या परिस्थितींत पवित्र वाटणारे विषय बदलतील, जुने जाऊन नवे त्या जागीं येतील एवढेंच. नवमतवादी विचारसरणीप्रमाणें नीतिमत्ता ही चंचल असली तरी अशा चंचल नीतिमत्तेंत कांही भाव स्थायी व शाश्वत असतात. परमेश्वर, परलोक, आत्मा, पुनर्जन्म इत्यादि विषयांवरील श्रद्धा आज लोपून त्यांचें पावित्र्य आज शंकास्पद वाटत असलें तरी आज शास्त्रज्ञान, प्रयोग, लोकसत्ता, समता इत्यादि नवीन तत्त्वांबरोबरच त्यांचे प्रणेते संशोधक, नेते, भौतिकशास्त्रज्ञ यांच्यावरील श्रद्धा दृढ आहे; त्यांच्याविषयीं पावित्र्य वाटणें हा आजचा युगधर्म आहे. अशा परिस्थितींत नव्याजुन्यांनी परस्परांवर टीका करतांना परस्परांच्या पावित्र्यभावना न दुखावतील याची काळजी वाहणें अत्यावश्यकें आहे. याच ठिकाणीं भावना दुखावणें म्हणजे त्यांचें विडंबन करणें ही भाषा रूढ होते. विडंबन आणि विवेचन यांच्यामधील सीमारेषा अस्फुट, अस्पष्ट आहे. पण या गोष्टीचा विचार करण्यापूर्वी विडंबन शब्दाच्या अर्थासंबंधानें विचार करणें प्राप्त आहे.

विडंबन या शब्दाचे संस्कृत कोशांत पुढील अर्थ सापडतात—अनुकरण, उपहास, दूषण, फसवणूक, भावना दुखविणें, विकृत करणें, हास्यास्पद करणें. हे मुळांतील अर्थ लक्षांत घेऊन लेखकानें विडंबन या शब्दाचे पुढीलप्रमाणें केलेले चार अर्थ सर्वांना संमत होण्याजोगे आहेत—(१) एखाद्या गोष्टीची केलेली निर्भेळ नालस्ती; (२) उपहास, टवाळी अगर हेटाळणी; (३) कुचेष्टामिश्रित पण सद्धेतुमूलक, आणि तत्रापि विपर्यस्तस्वरूपी, दोषादिग्दर्शन; आणि (४) परमतखंडनाचा आणि स्वमतमंडनाचा एक प्रकार. याला आंग्ल परिभाषेंत reductio ad absurdum असें नांव आहे. विडंबनाच्या पहिल्या आणि दुसऱ्या प्रकारांतहि लेखकानें स्पष्ट भेद केला आहे. विनोद हें उपहासाचें व टवाळीचें मुख्य शस्त्र; नालस्तीचें प्रमुख शस्त्र म्हणजे कुत्सित निंदा व हीन हेतूंचा आरोप. या प्रकारास 'विटंबन' अशी संज्ञा लेखकानें सुचविली आहे ती मान्य होण्यासारखी आहे. विडंबन हा मराठींत असलेला शब्द अव्याप्ति आणि अतिव्याप्ति या दोन दोषांनी दूषित आहे. उपहास, परिहास, parody, satire इत्यादि शब्दांचा विडंबनाशीं संबंध काय, त्यांच्यामध्यें अर्थसाम्य आणि अर्थवैषम्य कोणत्या बाबतींत आहे याची प्रा. कवीश्वरांनी उद्बोधक, सशास्त्र चर्चा केली आहे. आणि विडंबनविषयावर लिहिणाऱ्या अत्रे, सरवटे, केळकर, जोग इत्यादि पूर्वसूरींच्या मतांचा परामर्श घेऊन त्यांतून अखेरीस योग्य निष्कर्ष काढला आहे. विडंबन-काव्य ह्या रूढ सामासिक शब्दांतील ' विडंबन ' हा शब्द परिहास किंवा विनोद या अर्थानें बऱ्याच वेळां योजिलेला असतो. अत्र्यांची 'परिटास', उपाध्यांची 'चालचलाऊ भगवद्गीता', लिमयांची 'बल्लवदूत' इ. रूढ अर्थानें विडंबनात्मक असलेल्या कवितांत मूळच्या अनुक्रमें 'पांखरा येशिल का परतून', 'भगवद्गीता' आणि 'मेघदूत' यांची नालस्ती, टवाळी किंवा उपहास करण्याचा हेतु मुळींच नाही; केवळ मुळांतील चांगली उदात्त कल्पना कलाटणी देऊन, अन्य क्षुद्र विषयाला लावून मनोरंजन करण्याचा सोज्वळ हेतु स्पष्ट दिसतो. मूळ कृतीविषयीं अनादराची, छिद्रान्वेषणाची किंवा व्यंगदर्शनाची भावना कवीच्या मनांत होती याला पुरावा नाही. अर्थात् "साराच उपहास किंवा विनोद म्हणजे विडंबन नव्हे, आणि त्याचप्रमाणें सारेंच विडंबन

उपहासात्मक व विनोदपर नसतें " ( पा. २२ ) हा लेखकाचा निष्कर्ष मननीय वाटतो. प्रचलित सर्व मतांचा ऊहापोह केल्यावर लेखकाने विडंबनाची व्याख्या अशी दिली आहे.— ' एखाद्या विषयाच्या वास्तव स्वरूपाला कल्पनेची ठसठशीत भर देऊन तद्द्वारां केलेलें ( यथार्थ वा अयथार्थ ) दोषप्रदर्शन, म्हणजे विडंबन होय ( पा. ५१ ).' या सगळ्या सविस्तर चर्चेनंतर विडंबनाचे जे तीन पहिले प्रकार लेखकाने सांगितले आहेत त्यांना अनुक्रमें कुत्सित, विनोदी आणि सुधारक हीं त्याने दिलेलीं नांवें यथार्थ आहेत असा बोध होईल.

व्यक्ति, ग्रन्थ, तत्त्व, इत्यादींच्या विषयीं असलेली पावित्र्याची कल्पना ही प्रमाणाने न्यूनाधिक असते. पावित्र्य, आदर, पूजनीयता, भक्ति या सर्व भावना कमी अधिक प्रमाणांत उपयुक्ततेशीं निगडित असतात असें म्हटल्यास वावगें होणार नाही. उपयुक्तता ही अर्थलाभापुरतीच मर्यादित ठेवणें योग्य नव्हे. मनःस्वास्थ्य, उदात्त कल्पना, भावनांची शुद्धि, समाजस्थैर्य इत्यादींचा समावेश उपयुक्तता या शब्दाच्या व्यापक अर्थाच्या पोटीं निश्चितपणें होतो. समाजाचा सर्वांगीण अभ्युदय म्हणजे समाजोपयोगित्व. अर्थात् या व्यापक दृष्टीने विचार केला म्हणजे विवेचनाच्या सोयीसाठी आदरणीय, पूजनीय ( मानार्ह ), आणि पवित्र अशी लेखकाने केलेली वर्गवारी योग्य आहे असें वाटतें. वेद, श्रुति, ज्ञानेश्वरी, भगवद्गीता, लोकमान्य, महात्माजी, गणपति, सरस्वती, मातापिता इत्यादींचा समावेश पवित्र कोटींत करणें प्राप्त आहे. या पवित्र कोटींतील गोष्टींचें विडंबन निषेधार्ह होय.

ग्रन्थाच्या तीन ते पांच या तीन विभागांत लेखकाने विडंबनाच्या पहिल्या तीन प्रकारांची सोदाहरण चर्चा केली आहे. लेखकाने दिलेलीं उदाहरणें बहुतांशी निरपवाद मान्य होण्यासारखीं आहेत. विवेचनांत चिकित्सक बुद्धि, सत्यसंशोधनाची आकांक्षा, अनाग्रही वृत्ति, भाषेंतील संयम, हीन हेतूंचा अभाव, कठोर आत्मपरीक्षण, निष्पक्षपाती मांडणी आणि ज्ञानाभिवृद्धि यांना प्राधान्य असतें. आपली संस्कृति, धर्मग्रन्थ, माननीय देवता आणि व्यक्ति इत्यादि गोष्टींसंबंधाने वरील सर्व गोष्टी लक्षांत घेऊन एखाद्या पंडिताने चिकित्सक बुद्धीने धर्मग्रन्थांविषयीं, सांस्कृतिक कल्पनांविषयीं केलेली चर्चा जुन्या समजुतींना धक्का देणारी असली तरी ती विडंबन, विटंबन किंवा नालस्ती होणार नाही. रवीन्द्रनाथ टागोरांनी आर्यसंस्कृतीचें महत्त्व प्रस्थापित करणारे रामायण, महाभारत यांसारखे ग्रन्थ चिकित्सेसाठीं निवडले, आणि त्यांतील ऐतिहासिक सत्याची छाननी करून प्रचलित समजुतींना समूळ उखडून टाकणारीं मतें प्रतिपादन केलीं. त्याबद्दल एका ग्रन्थकाराने त्यांच्यावर पुढील शब्दांत टीकेचे प्रहार केले आहेतः " तात्पर्य, व्यास-वाल्मीकींनी पौराणिक कथानकांतील रहस्यगोपन केलें व पुराणांस निंद्य व विकृत स्वरूप दिलें, आणि शंकराचार्यांनी तर ईशोपनिषदांतील मंत्रहि फिरवून टाकले आणि भलताच वेदार्थ केला. अशा रीतीने सारे सत्यद्रोही व मूर्ख ठरले...राम दक्षिणेंतील शेतकरी ठरले, आणि श्रीकृष्ण फक्त गीतेपुरतेच कसेबसे उरले ! अशी भारतीय संस्कृतीची विटंबना करणें, हेंच विश्वभारतीचें अवतारचारित्र्य असेल, तर ह्या बुद्धिमंत कल्पकांस उगे बसण्यास काय घ्याल, असेंच विचारण्याची भाविक हिंदी जनतेस वेळ येईल. थोरांचा विद्याविनोदहि निदान अर्धवटांचा बुद्धिभेद करण्यास पुरेसा होतो. आणि या अर्धवटांत केवळ अशिक्षितच नव्हे तर कित्येक सुशिक्षितांचाहि समावेश करणें गैर नाहीं. यास्तव या चिकित्सक बुद्धीचा गौरव न करतां स्पष्ट शब्दांत निषेधच करणें, आम्हांस ज़रूर झालें आहे'. ( स. कृ. फडकेकृत ' नवयुगधर्म,' भाग २ रा, प्रकरण १८ वें, पृ. ३४६ ).

'न बुद्धिभेदं जनयेदज्ञानाम्' हें मौलिक तत्त्व मान्य करूनहि चिकित्सक संशोधनाचीं द्वारें बंद करणें हें ज्ञानाभिवृद्धीचीं कवाडें लावण्यासारखें आहे. आजच्या साम्यवादाच्या, बुद्धि-प्रामाण्याच्या युगांत ऐतिहासिक भौतिकवादानें प्राचीन इतिहासाची फेरतपासणी करणें अगदी योग्य आहे. पण ती करीत असतां भाषेंतील संयम आणि प्रामाणिक साधार चिकित्सा हींच आदरणीय होतील. आपल्या टीकेनें समाजाच्या बुद्धींत घर करून बसलेले अपसिद्धान्त समूळ नाहींसे झाल्यास कोणतीहि हानि नाहीं; परंतु समाजाच्या भावना दुखविणें हें शक्य तों टाळतां आल्यास अतिशय उत्तम. अर्थात् ही तारेवरची कसरत आहे हें मान्य करूनहि चिकित्सक पंडितांनीं असें मौलिक संशोधन चिकित्साबुद्धीने केल्याचीं अनेक उदाहरणें सहज स्मरणांत येण्यासारखीं आहेत. लालजी पेंडसे आणि धर्मानंद कोसांबी यांच्या ग्रंथां-तील लेखकानें प्रस्तुत ग्रंथात दिलेले उतारे भाषेचा संयम आणि शुद्ध चिकित्सक संशोधन यांच्या अभावाचीं उदाहरणें असल्यानें निंद्य नालस्तीचीं उदाहरणें होत. वैयक्तिक शारीरिक व्यंगदर्शनानें उपहास करणें यांत दुष्ट, विकृत आणि मत्सरी मनोवृत्ति दिसून येते. व्यक्तिगत निंदा आपण नेहमीच गर्ह्य मानतों. अशा स्थितींत श्रीकृष्ण आणि गणपति यांच्यासंबंधीं अत्रे आणि कोल्हटकर यांनी केलेला उपहास टवाळीच्या स्वरूपाचा होय. हें सुज्ञांना अमान्य असण्याचें कारण नाहीं.

याच ठिकाणीं आणखी एक मुद्दा सुचण्यासारखा आहे. लेखकाचा हेतु आणि त्याचा अपेक्षित परिणाम यांवरून मूळ बुद्धीच्या शुद्धाशुद्धतेची निश्चिति करतां येते. अत्र्यांच्या 'ब्रॅण्डीच्या बाटली'त बगारामाला स्वप्नांत का होईना श्रीकृष्णाच्या जागीं बसविण्यांत औचित्य-भंग तर झालाच आहे; परंतु त्यापुढें श्वा आणि मघवा एकत्र आणल्याप्रमाणें स्थिति होते, आणि श्रीकृष्णाला हीन विकाराच्या आहारीं घालवून त्याला निंद्य कोटींत ढकलण्यांत येतें. यामुळे हीन मनोविकारांना आश्रय देण्यांत श्रीकृष्ण आपला सोबती आहे असें वाटून त्याची वदनानी होते. गणपतीच्या मूर्तीचा उपहास करून कोल्हटकरांनी कोणतें सामाजिक कार्य साधलें याचा उलगडा त्यांच्या कोणाहि भक्तानें केल्याचें आठवत नाही. अशा वेळीं "उपहासाच्या मार्गापेक्षां शास्त्रीय विवेचनाचा मार्ग अधिक श्रेयस्कर आहे" अशी लेखकाची सूचना योग्य वाटते.

संस्कृत वाङ्मयातील कांहीं सुभाषितांत (हे हेरम्ब; हे गङ्गाधरपत्नि; कस्त्वं शूली इ. १२, ३०, १३, ४३, ५, ४५, सुभाषितरत्नभाण्डागारम्, पञ्चम संस्करण, शके १८३३) आणि एका नाटकाच्या नांदीपद्यांत (मालतीमाधव, सानन्दं नन्दिहस्ताहत-इ.) देवतांचें वर्णन परिहासात्मक केलेलें आहे. परंतु त्या सर्व ठिकाणीं लेखकांचा हेतु शुद्ध असल्यामुळे विडंबनाचा सुतराम् संभव नाहीं. संस्कृत व मराठी भक्तिपर वाङ्मयांत देवतेशीं आत्यंतिक जवळीक करण्याचा भक्ताचा आंतरिक जिव्हाळा स्पष्ट दिसत असल्यामुळे देवांच्या ठिकाणीं मानवी भावभावनांचा आरोप सर्वत्र केलेला आढळतो. तेव्हां देवांच्या कृतींचें वर्णन मानवांच्या प्रमाणेंच केलेलें आढळतें. त्या वर्णनाचा हेतु आदर-भक्ति अनंतगुणित व्हावी असाच निश्चितपणें असतो.

ग्रन्थाच्या पांच ते सात या विभागांत विडंबनाचा तिसरा प्रकार, पावित्र्यविडंबनाचें लंगडें समर्थन आणि विडंबनाच्या मर्यादा या विषयांची चिकित्सापूर्ण साधार चर्चा केली आहे. पांचव्या आणि सहाव्या विभागांतील बराच मजकूर या ग्रन्थाचीं स्वतंत्र परिशिष्टें म्हणून शोभण्याजोगा आहे. त्यांत वीर सावकरांचे 'गोपूजन-गोपालन' विषयक लेख आणि

गोखले यांची 'अभिसार' नामक लघुकथा यांमधून उत्पन्न होणाऱ्या प्रश्नांची साधकबाधक चर्चा केलेली आहे. शेवटल्या विभागांतील बुद्धिवादाच्या मर्यादा, धर्मांध, धर्मपर, धर्मनिष्ठ राज्य इत्यादींचें विवेचन त्याचा पावित्र्याच्या धर्मकल्पनेशीं निकटवर्ती संबंध असल्यामुळे उद्‌बोधक होण्यासारखें आहे.

'सीमित' ( पा. ३ ) हा शब्द तत्सम असला मराठींत रूढ नसल्याने अपरिचित वाटतो; तरी पण तो रूढ करण्यासारखा आहे. हिंदींत आणि हिंदी प्रांतांत राहणाऱ्या मराठी लेखकाच्या लेखनांत हा सरसकट वापरलेला आढळतो. 'अनुकरणित' (पा. २८, 'अनुकृत' हवें ) 'परामर्ष ( पा. १५ परामर्श,) यांसारखा एखादा अशुद्ध शब्द ग्रन्थात क्वचित् खटकतो. महत्त्व, सात्त्विक, तत्त्व इत्यादि व्युत्पत्तिसिद्ध द्वित्व आवश्यक असणारे सर्व शब्द निरपवाद सर्व ठिकाणीं चुकीचे ( उदा० तत्व, सात्विक ) छापले आहेत; हा 'मुद्राराक्षस' आहे असें म्हटल्याने समाधान होत नाही. वाङ्मयांतील पावित्र्य-विडंबनाची चर्चा करणाऱ्या ग्रन्थांत व्युत्पत्तिसिद्ध शुद्धलेखनाचें हें पावित्र्य-विडंबन झाल्यासारखें वाटतें.

प्रा. कवीश्वरांनी पावित्र्य-विडंबनासारख्या प्रचलित, जिव्हाळ्याच्या आणि वादग्रस्त विषयावर तर्कशुद्ध, साधार, सशास्त्र आणि विषयांच्या सर्व अंगांचा समतोल विचार करणारा हा ग्रन्थ लिहिलेला आहे. त्यांनी विचारपूर्वक निराग्रह वृत्तीने काढलेले निष्कर्ष आणि पावित्र्य–विडंबनाच्या सांगितलेल्या मर्यादा विवेचक बुद्धीला मान्य होतील असा विश्वास वाटतो. अशा अवघड विषयावर विद्वत्ताप्रचुर ग्रन्थ लिहिल्याबद्दल ते धन्यवादास पात्र आहेत असें म्हटल्यावांचून राहवत नाही.

—(प्रा.) रा. ना. गद्रे

बालकवि ( काव्यसमीक्षणात्मक प्रबंध )—[ ले० प्रा. रा. शं. वाळिंबे, एम्.ए. प्रकाशक चित्रशाळा प्रकाशन, पुणें २ ].

मराठींतील चिकित्सक व व्यासंगी टीकाकार म्हणून प्रा. रा. शं. वाळिंबे हे सर्व मराठी वाचकांना चांगले परिचित आहेत. टीकाविषयक व टीकात्मक अशीं दोन्हीं स्वरूपांचीं पुस्तकें लिहून या क्षेत्रांत त्यांनी चांगला लौकिक प्राप्त करून घेतला आहे. बालकवींवरील त्यांचा हा काव्यसमीक्षणात्मक प्रबंध त्यांच्या आजपर्यंतच्या कीर्तींत भर टाकील असाच आहे.

आधुनिक कवींवर व काव्यांवर आजपर्यंत अनेक टीका लिहिल्या गेल्या. त्यांत कोणी केवळ वर्गीकरणाच्या पद्धतीचा अवलंब केला, तर कोणीं रसग्रहणाच्या पद्धतीचा अवलंब केला. परंतु आधुनिक मराठी कवींच्या काव्यावर टीका करतांना त्या कवींचें त्यांच्या काव्यांत प्रगट झालेलें व्यक्तिमत्त्व विचारांत घेऊन नंतर त्या काव्यावर रसोद्‌ग्राही पद्धतीने टीका करण्याची पद्धत फारच थोड्यांनी अवलंबिली. प्रा. वाळिंबे यांनी या दृष्टीने एक पाऊल पुढे टाकलें आहे व आधुनिक कवींच्या काव्यांवरील टीकेचा एक नवा आदर्श आपणांपुढे ठेवला आहे असें हा प्रबंध वाचतांना निश्चित वाटेल.

आत्मनिष्ठ कवींच्या काव्यांत प्रगट झालेल्या कवीच्या व्यक्तिमत्त्वाची ओळख करून घेतांना कवीच्या चारित्र्याची माहिती असणें आवश्यक आहे—आणि आपणांकडे त्याचाच मोठा अभाव आहे. यामुळे पुष्कळ वेळां कवींच्या काव्यांत उत्कटपणें प्रतिबिंबित होणाऱ्या भावना

कवींच्या, स्वतःच्या की दुसऱ्याच्या हें ओळखणें कठीण जातें. प्रा. वाळिंबे यांच्या समोरहि हीच अडचण उभी आहे. पण त्यांतल्या त्यांत 'कवीच्या काव्यांत प्रकट झालेल्या व्यक्तिमत्त्वाचा सहानुभूतीने अभ्यास करून त्या व्यक्तिमत्त्वाच्या ज्ञानाच्या आधारें पुन्हां त्याच्या काव्याकडे वळावें व प्रथम रसोद्ग्राही पद्धतीने त्याचें समीक्षण करावें व असें समीक्षण पूर्ण झाल्यानंतर मगच आपणास अभिप्रेत असलेल्या मूल्यांच्या आधारें त्या कवीच्या कवित्वविषयक कामगिरीचें महत्त्वमापन करावें,' या प्रास्ताविकामध्ये सांगीतलेल्या मार्गाचा अवलंब करून या अडचणींतून त्यांनी आपली सोडवणूक करून घेतली आहे.

या पद्धतीचा स्वीकार केल्यामुळे त्यांच्या प्रबंधाचें स्वरूप द्विविध झालें आहे. एका भागांत बालकवींच्या काव्यांतून घडणारें त्यांच्या व्यक्तिमत्त्वाचें दर्शन व दुसऱ्या भागांत त्यांच्या कवित्वविषयक कामगिरीचें मूल्यमापन. पण हीं दोन्हीं कार्यें पृथक् असलीं तरी त्याची गुंफण प्रा. वाळिंबे यांनी इतक्या कुशलतेने केली आहे की त्यामुळे प्रबंधाच्या एकात्मतेला कोठेहि धक्का लागल्यासारखें वाटत नाहीं.

पहिल्या भागांत कवीच्या व्यक्तिमत्त्वाचें त्या काव्याच्या अनुरोधाने दर्शन घडवितांना बालकवींची वृत्ति निसर्गात अधिक कां रमली याचें त्यांनी केलेलें विवेचन मार्मिक व मूलगामी पद्धतीचें आहे. बालकवींच्या काळांत भोंवतालीं समाजांत व राष्ट्रांत केवढ्या तरी वैचारिक व राजकीय घटनांचे पडसाद उमटत होते. केशवसुतांनी मोठ्या आवेशाने फुंकलेल्या तुतारीचे पडसाद सर्वांच्या कानांत त्या वेळीं घुमत होते; सामाजिक व आर्थिक विषमतेचा धिक्कार करून मानवतेचा नवा आदर्श त्यांनी आपल्या काव्यांतून पुढे मांडला होता. पण बालकवींचें मन या सर्वांपासून अलिप्तच राहिलें. परिस्थितीकडे त्यांनी पाठ फिरवली ती त्यांना त्या परिस्थितीची जाणीव नव्हती म्हणून नव्हे, तर त्या परिस्थितीला तोंड देण्याचा, तिचा काव्यांतून आविष्कार करावयाचा कणखरपणा त्यांच्या ठिकाणीं नव्हता म्हणून. मानवी जीवनांतील व्यथांचा व दुःखांचा विचार करून हळव्या झालेल्या त्यांच्या मनाला 'प्रेम' व 'सौंदर्य' या दोनच गोष्टींनी विलक्षण विरंगुळा मिळाला, व त्यांचें खरें दर्शन त्यांना निसर्गात घडलें. भव्य, दिव्य व चैतन्ययुक्त अशा सौंदर्याचा साक्षात्कार त्यांना निसर्गात घडला, अस्थिर, व विनाशी अशा मानवी सौंदर्यापेक्षां स्थिर व अविनाशी अशा सृष्टिसौंदर्यात 'आनंदी आनंद' मिळाला. जीवनांतील अपूर्णता अशी 'दिव्यांची श्रेणी' पाहत असतांना पूर्ण होत असल्याचा आभास त्यांना झाला व त्या सृष्टींतच ते रमले. 'सौंदर्य व प्रेम' या गोष्टी बालकवींच्या दृष्टीने अभिन्न असल्याने जेथे जेथे सौंदर्याचा साक्षात्कार त्यांना होत असे तेथे तेथे प्रेमाची प्रतीतीहि त्यांना येई. यामुळे सृष्टिसौंदर्यात ठिकठिकाणीं त्यांना प्रेमाचा साक्षात्कार झाला—अरुणोदय म्हणजे 'प्रेमकाल' अशी जाणीव त्यांना होऊं लागली, तेजाच्या रूपाने प्रेमाची लाटच जगावर येत आहे असें त्यांना वाटूं लागलें व ब्रह्मांडाचा गोलसुद्धा प्रेमाचा फेर धरीत असल्याचा भास त्यांना होऊं लागला. थोडक्यांत म्हणजे 'स्वतःच्या जीवनांत जो आनंद नव्हता, जें प्रेम नव्हतें, तो आनंद व तें प्रेम यांची प्राप्ती करून घ्यावी याच उद्देशाने बालकवींनी भोंवतालच्या क्षुद्र, दुःखपूर्ण, स्वार्थी, सौंदर्यशून्य अशा मानवी जगताकडे पाठ फिरविली व निसर्गाशी ते तादात्म्य पावले.' बालकवींच्या व्यक्तिमत्त्वाचें त्यांच्या काव्यांत आविष्कृत होणारें वरील स्वरूप प्रगट करतांना प्रा. वाळिंबे

यांनी केलेलें विवेचन खरोखरच अतिशय मार्मिक आहे. पण त्याबरोबरच त्यांनी केलेली बालकवींच्या निसर्गतादात्म्याची मीमांसा अधिक मूलगामी आहे. आल्बर्ट मॉडेल या लेखकानें The Erotic Motive in Literature या पुस्तकांत निसर्गप्रेमाविषयीं जें विवेचन केलें आहे त्यांत अतृप्त प्रेमासक्तीवर रामबाण औषध म्हणून किंवा प्रेमाचें स्फूर्तिस्थान म्हणून निसर्गाची उपासना कवि करतात असा मुद्दा मांडला आहे. त्यावर आक्षेप घेतांना बालकवींचें निसर्गप्रेम ह्या दोन्हींतून निर्माण झालें नसून बालत्वसुलभ कुतूहल, व औदासीन्यानें गांजल्यामुळे निसर्गसौंदर्यात त्यांना मिळणारें विलक्षण समाधान यांतूनच त्यांच्या निसर्गप्रेमाचा उगम होतो व अशा अलौकिक, विश्वात्मक सौंदर्याच्या दर्शनानें त्यांच्या मनांत निर्माण झालेलें प्रेमहि तितकेंच दिव्य, अलौकिक व शाश्वत होतें असा त्यांनी मांडलेला मुद्दा कोणालाहि पटण्यासारखा आहे.

बालकवींच्या काव्यांतील अनेक वैशिष्ट्यांचें स्वरूपहि प्रा. वाळिंबे यांनी मोठ्या रसिकतेनें उलगडून दाखविलें आहे. त्या दृष्टीनें 'बालकवींच्या कल्पनाविलासाचें स्वरूप', 'रंगाची विलक्षण आसक्ति', 'निसर्गातील संगीत' हीं प्रकरणें तर आंतील विवेचनाच्या दृष्टीनें अतिशय मौलिक स्वरूपाचीं आहेत. या तीनही प्रकरणांतून बालकवींच्या तरल स्वप्नसृष्टीचें दर्शन अत्यंत रसिकपणें त्यांनी घडविलें आहे. आणि तें दर्शन घडवितांना पाश्चात्य कवींच्या काव्यांतील समान वर्णनाचे तुलनेसाठी दिलेले उतारे त्यांच्या व्यासंगीपणाची चांगलीच साक्ष पटवितात. बालकवींच्या संप्रदायाचा विचार करतांना संप्रदायनिर्मितीच्या मागील भूमिका त्यांनीं विस्तारानें स्पष्ट केली असून बालकवींची निसर्गगीतें मराठींतील रोमँटिक संप्रदायांतील इतर कवींच्या निसर्गगीतांहून सर्वस्वीं भिन्न कशीं आहेत हें त्यांनी दाखविलें आहे. बालकवींचा संप्रदाय कां निर्माण होऊं शकला नाहीं याचें त्यांनी केलेलें विवेचनहि पूर्णपणें पटण्यासारखें आहे. त्यांच्या कवितेचें मूल्यमापन करतांना त्यांनी बालकवींच्या काव्यांतील वैगुण्येंहि नजरेआड केलीं नाहींत. बालकवींचें कलाजगत् कितीहि रम्य, मोहक व स्वप्नमय असलें तरी तें अत्यंत मर्यादित होतें—अरुण, संध्या, तारका, रजनी, निर्झर इत्यादि मर्यादित निसर्गस्वरूपांतच त्यांचें मन रमलें, त्यांतच त्यांनी स्वतःची धुंद अशी सृष्टि निर्माण केली; पण त्यापलीकडे त्यांची दृष्टि गेली नाहीं; निसर्गाच्या पार्श्वभूमीवर विविध भावनांच्या रंगांत रंगणाऱ्या मानवी जीवनाकडे त्यांचें लक्षच नव्हतें; आणि यामुळेंच जगांतील श्रेष्ठ कवींच्या पंक्तींत त्यांना स्थान मिळणें शक्य नाहीं हा प्रा. वाळिंबे यांनी काढलेला निष्कर्ष कोणालाहि पटेल.

प्रा. वाळिंबे यांच्या 'बालकवी'वरील काव्यसमीक्षणात्मक प्रबंधाचें हें स्वरूप पाहिलें तर त्यांत त्यांचा व्यासंग, त्यांची रसिकता व त्यांची चिकित्सक दृष्टि यांचा त्रिवेणीसंगम झाला आहे असें वाटल्यावाचून राहत नाहीं. कीट्स्, शेली, वर्ड्स्वर्थ, टेनिसन इत्यादि कवींच्या काव्यांतील समानार्थक उध्दृत केलेल्या पंक्ति व त्यांचें तुलनात्मक दृष्टीनें केलेलें विवेचन त्यांच्या आंग्लकाव्याच्या अभ्यासाची चांगली साक्ष पटवितें. 'बालकवी'सारख्या कवीच्या काव्याचें परीक्षण करावयाचें म्हणजे अत्यंत अवघड कार्य! बालकवीच्या अन्तरंगाशीं एकरूप होऊन त्यांच्या समवेत निसर्गातील भव्य व दिव्य सौंदर्याचा अनुभव घेतल्याशिवाय व त्यांच्याप्रमाणेंच त्या सौंदर्यदर्शनानें वृत्ति तल्लीन झाल्याखेरीज त्यांच्या काव्याचें खरें मर्म समजणें कठीण. ती एकरूपता प्रा. वाळिंबे यांनी निश्चित अनुभवली असावी याचा

प्रत्यय त्यांचा प्रबंध वाचीत असतांना जागोजागीं येतो. आणि ह्या एकरूपतेचा अनुभव घेत असताना त्यांची डोळस चिकित्सक वृत्ति सदैव जागृत होती हेंहि लक्षांत ठेवलें पाहिजे.

थोडक्यात सांगावयाचें झालें तर काव्यावरील आस्वादक टीका कशी असावी याचा आदर्श प्रा. वाळिंबे यांनी या काव्यसमीक्षणाच्या रूपाने ठेवला आहे असें म्हटलें तर त्यांत अतिशयोक्ति होईल असें वाटत नाही.

—(प्रा.) म. ना. अदवंत

**नागरी लिपिशुद्धीचें आन्दोलन**—[ ले. वि. दा. सावरकर. प्रकाशक— ग. पां. परचुरे प्रकाशनमंदिर, मुंबई. मूल्य अडीच रुपये ]

प्रस्तुत लहानशा पुस्तकांत लिपिसुधारणेच्या बाबतींत श्री. वि. दा. सावरकर यांनी जी चळवळ केली व जे लेख लिहिले त्यांचें संकलन केलें आहे. या संकलनांत सन १९२७ ते सन १९३७ पर्यंत लिहिले गेलेले लेख अन्तर्भूत केलेले आहेत. यांत एकंदर लेख २९ असून त्यांपैकी पहिले २२ लेख सन १९२७ ते १९३० या कालांत व पुढील ७ लेख १९३४ नंतरच्या कालांत लिहिलेले आहेत. संकलनाचा उद्देश प्रकाशकांनी मागेच येऊन गेलेल्या योजनांचें आणि त्यावरील आक्षेपप्रत्याक्षेपांचें चर्वितचर्वण पुनः पुनः करण्याचें कारण उरणार नाही, तितके श्रम आणि काळ ज्याला हवा असेल त्याला वाचविता येईल, असा दिला आहे. यावरून सामान्यतः वाचकांस असें वाटण्याचा संभव आहे की, हें पुस्तक वाचलें म्हणजे १९३७ पर्यंत लिपिसुधारणेच्या बाबतींत झालेल्या प्रयत्नांची माहिती करून घेण्याकरितां दुसरीकडे पाहण्याची जरूरी उरणार नाही. परंतु वस्तुस्थिति तशी नसून यांत फक्त श्री. सावरकर यांनी लिहिलेल्या लेखांचेंच संकलन असून एकंदर साकल्याने माहिती मिळविण्याच्या कामीं तें अपूर्ण आहे.

या लेखांपैकी पहिल्या लेखांत या आंदोलनाची भूमिका दिलेली आहे. ती सामान्यतः सर्वांस मान्य होण्यासारखी आहे. त्यानंतर श्री. सावरकर यांनी या बाबतींत क्रमाक्रमाने ज्या सुधारणा केल्या त्यांची माहिती दिली असून श्री. अत्रे, वैद्यबंधु, लेलेशास्त्री, शितूत, नानल, गुर्जर इत्यादि गृहस्थांनी जे प्रयत्न केले त्यांची माहिती दिली आहे व कांही लोकांबरोबर झालेला पत्रव्यवहार दिला आहे.

यानंतर श्री. अत्रे यांचें नागरी टंकयंत्र, श्री. शं. रा. दाते यांचें एकटंक यंत्र व श्री. गोईल यांचें नागरी पंक्तिटंक यंत्र यांसंबंधींहि त्रोटक विवेचन केलें आहे. तसेंच श्री. विजापुरे यांचेंहि त्यांच्या प्रयत्नाबद्दल अभिनंदन केलें आहे. तसेंच महाराष्ट्रसाहित्य संमेलनाने नेमलेल्या समितीनें जे तात्पुरते निर्णय हैद्राबाद येथील १९३१ मध्ये भरलेल्या साहित्यसंमेलनांत मान्य केले होते त्यांबद्दल विवेचन केलें आहे.

यानंतर श्री. सावरकर यानी स्वतः सुचविलेल्या सुधारलेल्या लिपीच्या टंकांचा नमुना दिला आहे व पृष्ठ १२० पासून पुढचीं पृष्ठें या नवीन लिपींत मुद्रित केलीं आहेत.

या नवीन मजकुरांत १९३४ सालीं हिंदी साहित्यसंमेलनामध्ये दिल्ली येथे एक लिपिसुधारणासमिति नेमली होती तींत श्री. सावरकरांचे नांव होतें ही माहिती दिली आहे. पण या समितीनें कोणतें कार्य केलें तें मात्र दिलेलें दिसत नाहीं. या समितीने कांही कार्य केलें नसावें म्हणूनच बहुधा १९३५ सालीं हिंदी साहित्यसंमेलनाने पुन्हा एकदां काका

कालेलकर यांस संयोजक नेमून समिति नेमली ही माहिती दिली आहे; पण या समितींत महाराष्ट्रांतील श्री. शं.रा. दाते. व श्री य. रा. दाते हे सभासद होते ही माहिती दिली नाही.

या समितीने वर्धा येथे जे ठराव केले त्यांतील कांही ठराव मान्य असल्याचेंहि दिलें आहे, परंतु या समितीची दुसरी बैठक अलाहाबाद येथे झाली तिच्या निर्णयाची माहिती दिलेली नाही. त्यानंतरहि हिंदी साहित्यसंमेलनानें पुन्हा एक समिति नेमली होती; तिचाहि उल्लेख आढळत नाहीं.

तसेंच महाराष्ट्र साहित्यसंमेलनाने बडोदे येथे जी सर्व भारताकरिता नागरी लिपीची सुधारणा करून टंकयंत्र, मुद्रण वगैरेकरितां सुधारलेल्या लिपीचें स्वरूप सुचवावें म्हणून एक समिति नेमली ती समिति व तिने आपला अहवाल व सूचना १९३५मध्ये इंदूर येथे भरलेल्या संमेलनांत मान्य करून घेतल्या होत्या त्यांची माहिती लेखकास दिसत नाही. या समग्र सुचविलेल्या सुधारणा साहित्यपत्रिकेंत प्रसिद्ध झाल्या होत्या. वास्तविक या १९३७ पर्यंतच्या लिहिलेल्या इतिहासांत या सूचना यावयास पाहिजे होत्या. असो.

प्रथमच सांगितल्याप्रमाणें लिपिसुधारणेच्या कार्याचा हा संपूर्ण व अद्यावत् इतिहास नसून श्री. सावरकरांच्या कांही लेखांचा संग्रह आहे.

प्रथम लिपिशुद्धीचें आंदोलन म्हणून जो या लेखास मथळा दिला आहे तो अयोग्य आहे. कारण पूर्वीची लिपि अशुद्ध असून आज तिला कोणी शुद्ध करूं पाहत आहे ही भूमिका आमच्या मतें बरोबर नाहीं. लिपीमध्यें सुधारणेच्या दृष्टीनें, प्रथम श्रम व कागद वांचविण्याच्या व वळण सुधारण्याच्या दृष्टीने ब्राह्मीच्या स्वरूपांत फरक होत गेले ही गोष्ट लेखकासहि मान्य आहे. तेव्हां त्या वेळीं ती सुधारणाच होती, अशुद्धीकरण नव्हतें. फार तर द्र, क्र, द्ध, वगैरे संयुक्ताक्षरें अशुद्ध पद्धतीनें लिहिलीं जात असें म्हणतां येईल. अलीकडे लिपीमध्यें टंकन, मुद्रण, एकटंकन, पंक्तिटंकन वगैरे दृष्टींनी सुधारणा होत आहे एवढेंच.

आतांपर्यंत या बाबतींत संशोधन व परिश्रम करणाऱ्या अनेक गृहस्थांनी आपापल्या परीने सुधारणा सुचविल्या आहेत व कांहींनी त्या प्रत्यक्ष व्यवहारांत उतरविल्या आहेत. ज्याप्रमाणें पक्वान्नाची परीक्षा खाणाराने करावयाची असते त्याप्रमाणे जी सुधारलेली लिपि वाचकास व मुद्रकास सोईची व परवडणारी वाटेल व जिचा प्रसार विशेष होऊन अधिकांश जनतेकडून ग्राह्य होईल तीच लिपि सर्वत्र रूढ होण्याचा संभव अधिक ही गोष्ट कोणीहि मान्य करील. या दृष्टीने या विषयांत परिश्रम करणाऱ्या सर्वांसच एकंदर सुधारणेचें श्रेय आहे.

हें पुस्तक आज १९५० या वर्षी प्रसिद्ध होत आहे; म्हणजे १३ वर्षांनी मागासलेलें आहे. १९३७ नंतर या बाबतींत बरेंच आंदोलन झालेलें आहे. त्याचा परामर्ष एखादी प्रस्तावना अगर उपसंहार जोडून केला असता तर अधिक उपयोग झाला असता.

महाराष्ट्र साहित्यपरिषदेने इंदूर येथील १९३५ च्या संमेलनांत संमत केलेल्या योजनेनंतर सन १९४० सालीं सोलापूर येथील साहित्यसंमेलनांत तेथेच श्री. य. रा. दाते यांच्या अध्यक्षतेखाली भरलेल्या मुद्रकसंमेलनाने 'अ'च्या बाराखडीपुढे जाऊन उकार चिन्हें सरळ रेषेंत आणण्याबद्दल ज्या सूचना केल्या होत्या त्या मान्य करण्यांत आल्या होत्या. त्यानंतर आचार्य नरेन्द्र देव यांच्या अध्यक्षतेखाली एक नागरी लिपिसुधारणासमिति नेमण्यांत आली होती. तसेंच मुंबई सरकारने मराठी व गुजराती लिपींकरितां काका कालेलकरांच्या

प्रमुखत्वाखाली एक समिति नेमली होती तिचा अहवाल प्रसिद्ध झालेला आहे. त्यानंतर या सर्वांचा विचार करून मुद्रणसुलभतेच्या दृष्टीने व्यवहार्य व सुलभ अशी एखादी योजना सुचविण्याकरितां नागपूर येथे भरलेल्या महाराष्ट्र मुद्रण परिषदेनें श्री. य. रा. दाते यांच्या अध्यक्षतेखाली एक समिति नेमली आहे.

आज 'अ'च्या बाराखडीचा प्रचार बराच झालेला असून मराठींत व राष्ट्रभाषेंत तिचा उपयोग दृष्टीस पडतो. संयुक्ताक्षरांतहि सुधारणा झाली आहे. इतरहि सुधारणा जनता किंवा सरकार यांच्या साहाय्याने होऊं शकतात.

या पुस्तकांत विशेषतः व्यक्तींच्या नांवांत कांही ठिकाणीं अशुद्धें आहेत. त्यामुळे वाचकांचा घोटाळा होण्याचा संभव असतो. कॅरे याचें नांव कने असें छापलें आहे. (पृ. १२) यांत दोन चुका आहेत व सावरकरी 'र' हा न वाचला जाण्याचा संभव आहे ही गोष्ट स्पष्ट झाली आहे. तसेंच या मुद्रणांत हा 'र' कांही ठिकाणीं बोजड वाटतो. कृष्णाजी केशव गोखले यांचे नांव के. कृ. गोखले असें दिलें आहे (पृ. १५). श्री. शंकर रामचंद्र दाते यांचें नांव शं. वा. दाते असें छापलें आहे (पृ. ११२). तसेंच त्यांनी अच्या बाराखडीची सुधारणा जरी मान्य केली असली तरी आपल्या एकटंक यंत्रांत जुनीं इ, उ व ए या अक्षरांचीं वळणें जुनींच ठेवलीं आहेत, ही गोष्ट स्पष्ट केली नाही. पृ. १२४ वर श्री. सत्यनारायण सिंह (मद्रास) असें छापलें आहे तें बरोबर दिसत नाही. बहुधा हे गृहस्थ श्री. एम. सत्यनारायण (मद्रास) हे असावेत. समिति या अर्थी उपसमिति शब्द वापरलेला आढळतो. असो.

ज्यांस श्री. सावरकर यांनी लिपि सुधारण्यासंबंधीं केलेले परिश्रम व त्यांची योजना समजून घ्यावयाची असेल त्यांस हें पुस्तक उपयुक्त होईल. पण तें संपूर्ण व अद्यावत् नाही हें वर सांगितलेंच आहे.

—य. रा. दाते

**मराठी कविता–१९२०–१९५०** [सुमारें ८० कवींच्या कवितांचा संग्रह; प्रकाशक० मुंबई मराठी साहित्य संघ, मुंबई ४, मूल्य रु. ५]

मराठीच्या या प्रातिनिधिक काव्यसंग्रहाचीं पानें आंतील काव्यप्रकारांच्या दृष्टीने चाळीत असतां पान ५४ वर कवि केशवकुमार यांची विडंबनात्मक कविता "एक काव्य-प्रकार" ही आढळली. शेवटची टीप अशी दिसली:

"वरील वाङ्मयप्रकाराला मुक्तछंदी काव्य म्हणतात. मेहेरबानी करून हें काव्य वाचतांना वाचकांनी मूर्च्छित पडूं नये." आणि चटकन् मला मुंबईतील साहित्यसंमेलनाच्या प्रसंगीं झालेल्या मुख्य मुख्य कवींच्या काव्यगायनाच्या कार्यक्रमाची आठवण झाली. गिरीश, यशवंत, केशवकुमार (अत्रे) आदि प्रौढ कवि आपापलीं काव्यें व्यवस्थितपणें म्हणून गेले व लोकांनी त्याचें यथोचित स्वागत केलें. मग संजीवनी, कुसुमाग्रज, वसंत वैद्य वगैरे (नवीन) कवींनी आपलीं काव्यें गाऊन दाखविलीं. तींहि श्रोत्यांनी रसिकतेने ऐकलीं. त्या-नंतर एक नवीन तरुण कवि पुढें आला. नांव विंदा करंदीकर (प्रा. गो. वि. करंदीकर). त्याने आपलें 'क्रांतीचें सूक्त' आपल्या बिनगायकी, साध्याच पद्धतीने म्हणावयास सुरुवात केली. एकामागून एक चरण पुढे चालले, तसा 'सार' किंवा उत्कर्षालंकाराचा साक्षात्कार होऊं लागला; आणि त्या पठणाचा कळस शेवटच्या "ॐ क्रान्तिः क्रान्तिः क्रान्तिः" या मंत्रोच्चारने झाला. श्रोतृवर्ग निस्तब्धपणें व अधीरतेनें ऐकत होता. या अगदी "मुक्त"

पद्धतीच्या काव्यपठणाच्या मेघगर्जनेनें श्रोतृवर्ग ' मूर्च्छित ' तर झाला नाहीच, पण व्यास-पिठावरचे केशवकुमारहि भानावर असलेले दिसले. नंतर त्यांनी आपली " माझ्या मना बन दगड " ( पान २१५ ) ही कविता तशीच खडखडीतपणें म्हणून दाखविली. लोकांना या काव्यगायनांतील मर्म अचूक कळलेलें दिसलें. उघडाउघड या कवीनें त्या रात्रीची मजलस जिंकली होती; आणि तीहि या "मुक्तछंदी" काव्यानें ! गेल्या १५–२० वर्षांत केवढा हा फरक पडला आहे ! आणि मग मी प्रस्तुत काव्यसंग्रहाची पानें मुक्तछंदाच्या दृष्टीने पुढे उलटूं लागलों. मुक्तछंदाचे प्रयोजक अनिल व वा. ना. देशपांडे तेथे आढळले, रा. अ. काळेले यांचीं चारांपैकीं दोन गीतें, वसंत वैद्यांच्या दोन गीतांपैकी एक, पु. शि. रेगे यांचें दीर्घ काव्य " उर्वशी, " वि. म. कुलकर्णी यांच्या तीन कवितांपैकी दोन, मुक्तिबोधांची थोडी मुक्तछंदाहून निराळी मुक्तशैलीची एक सुंदर कविता " आज कशानेहि येईनाशी झाली झोप, " विंदा करंदीकरांच्या तिहींपैकी दोन कविता ( एक त्यांच्या खास मात्रावर्तनी मुक्तछंदाची ) आणि मंगेश भगवंत पतकी यांची एक कविता अशीं अनेक " प्रातिनिधिक " कवींचीं काव्यें मुक्तछंदांत आढळलीं !

पण त्याबरोबरच नवीन कवींच्या काव्यांत फिरून एक तऱ्हेची गीतगुंजनाची लहर प्रादुर्भूत झाल्याचेंहि आढळून आलें. नवीन तरुण कवींना भावगीतात्मक वैणिकांचीं (lyrical songs) मोहनी फार पडलेली दिसते. आणि ती गीतप्रबंधांच्या कांहीशा नवीन रूपांत प्रकट होतांना आढळते. कवि तांबे यांनी ही वैणिक गीतिरचना मराठींत प्रामुख्याने आणली आणि रविकिरण मंडळाच्या सदस्यांनी तिचा विस्तार केला. पण ठराविक प्रकारची "नववधू" जातिरचनेची रचनाच अधिक प्रसार पावली. प्रस्तुत संग्रहांत वरील कवींव्यतिरिक्त फारच थोड्या कवींचीं अशीं तांबेपद्धतीचीं गीतें प्रातिनिधिक म्हणून स्वीकारलेलीं आढळतात. उलट बोरकर, संजीवनी, कांत, निकुंभ, शांता शेळके यांची कांहींशीं जुन्या नमुन्याचीं भावात्मक गीतें आपल्या व्यक्तिगत वैशिष्ट्याचाहि आविष्कार करतात. बोरकरांच्या इतर कांही गीतांत तर नवीनतर सौंदर्यपिपासेची मनोवेधक अभिव्यक्तिहि झालेली आढळते. पण या ठराविकाच्या धाच्याबाहेर निसटून भाव व्यक्त करणारीं कै. लोटलेकर यांचीं नितांतमधुर गीतेंहि येथे संगृहीत केल्याबद्दल संपादकांचें अभिनंदनच केलें पाहिजे. ना. घ. देशपांडे यांचीं गीतेंहि याच दर्जाचीं असतात. त्यांचा संग्रह अजून प्रसिद्ध झाला नसल्यामुळे त्यापैकीं कांही येथे वाचावयास मिळतात हा केवढा लाभ ! ( निवड मात्र याहून अधिक चांगली करतां आली नसती काय ? ) माडगूळकर, बढे यांनी केलेली अतिशय भावपूर्ण गीतरचना सर्वांच्या परिचयाची झालेली असून तिला योग्य तें स्थान येथे मिळालें आहे. या अव्वल भावमंथर व नादमधुर गीतरचनेचे अगदी अलीकडचे प्रतिनिधि म्हणून मंगेश पाडगांवकर यांचें नांव चट्कन् तोंडाशीं येतें. त्यांचेंहि एक गीत येथें संग्रहिलें आहेच. आणि रेगे, पोवळे या जोडीचें 'मस्त' भावकाव्यहि येथे आहे. विशेषतः रेगे यांच्या ऐंद्रियसंवेदनात्मक ( sensuous ) नखरेल कवितेला योग्य प्रातिनिधिकत्व मिळालेलें आहे. इंदिरा संतांची भावनाकुल रचना येथे आलेली आहे. ओजोगुणयुक्त कवितांची निवड पाहूं जातां त्याबाबतींत मात्र कांही उणीव भासते. या ओजस्वी काव्याचे सर्वोत्तम निर्माते सावरकर आहेत; आणि त्यांचें काव्य या संग्रहाच्या मर्यादेंतील कालांतच प्रसिद्ध झालेलें असूनहि येथे दिलेलें नाही. पण, कदाचित्, या संग्रहाच्या संपादकांच्या कवितेच्या व्याख्येंत तीं काव्यें बसतहि नसतील ! परंतु अनिलांच्या ओजस्वी काव्यास तरी येथे पुरतें प्रातिनिधिकत्व असावें, तेंहि नाही. येथेहि संपादकांच्या

त्या कवीविषयींच्या दृष्टिकोणामुळेच फरक पडलेला आहे. कुसुमाग्रजांच्या उत्कृष्ट कविता येथे आल्या आहेत. पण त्यांच्या कवितेतील ओजोगुणाची चमक मात्र एका कवितेतच— "अहिनकुल" मध्यें—प्रतिनिधित्व पावली आहे. कांतांची एक कविता या तऱ्हेची येथे दिलेली आहे—पण तीही "नववधु"—प्रकाराची 'भावगीत' रचना आहे व म्हणूनच बहुधा दिलेली असावी! एकंदरींत या संग्रहांत देशभक्तीच्या किंवा राष्ट्रीय कवितेलाच काय पण मानवतानिष्ठ ओजस्वी कवितेलाहि योग्य तें प्रातिनिधिकत्व मिळालें नाही असेंच म्हणावें लागतें. संपादकांच्या कविताविषयक वैयक्तिक मतांचा येथे जरा प्रमाणाबाहेर अंमल झाला असें म्हणणें क्रमप्राप्त आहे.

'नवकाविता' म्हणून जी विशिष्ट प्रकारची कविता आज मराठींत लिहिली जाऊं लागली आहे तिला माल योग्य तें स्थान या संग्रहांत दिल्याबद्दल संपादकांना धन्यवाद दिले पाहिजेत. पण त्यांतहि जुगुप्साप्रधान, संज्ञाप्रवाहनिष्ठ काव्याला जें प्रातिनिधिकत्व मिळालें आहे त्या मानानें सामाजिक आशयाला प्राधान्य असलेल्या नवकाव्याला कमी स्थान मिळालेलें आहे—जवळ जवळ नाहीच. त्यालाहि कदाचित् संपादक खरें काव्य मानीत नसावेत. नाही तर शरच्चन्द्र मुक्तिबोधांच्या किंवा विंदा करंदीकरांच्या इतर चांगल्या कविता, वसंत बापटांच्या अन्य कविता ( यांची एक कविता "सोनापूरच्या भिंतीवरती" ही संग्रहांत आहे, पण ती त्या कवीची प्रातिनिधिक म्हणतां येईल काय ? ) उमर शेख किंवा असेच इतर सामाजिक आशयवादी गीतकर्ते यांची उत्तम कवनेंहि यांत संग्रहीत झालीं असतीं तर बरें झालें असतें. परंतु या संग्रहांत विशेषतः मर्ढेकर, आणि य. द. भावे, व मनमोहन यांची सामान्यतः प्रातिनिधिक काव्यें देऊन संपादकांनीं नवीन काव्यप्रवाहाची योग्य ती बूज राखली असेंच म्हटलें पाहिजे.

पण या जुगुप्साप्रधान प्रकृतीच्या काव्यालाहि प्रतिनिधित्व दिल्याबद्दल समाधान व्यक्त करतांना एक विचार मनांत डोकावतो. तो असा की, खरोखरच राष्ट्रीय भावनेच्या आणि सामाजिक आशयाच्या कवितांना 'कविता' या दृष्टीनें प्रतिनिधित्व नाकारणाऱ्या संपादकीय दृष्टीला हीं काव्यें तरी खरीं 'काव्यें' वाटतात काय ? तसें असेल तर हा एक मोठा विस्मयकारक विरोधाभास म्हटला पाहिजे ! आजचे रथी महारथी कविटीकाकार या काव्य-प्रकाराला काव्यक्षेत्राबाहेर हुसकून लावण्यासाठी स्पष्टोक्ति करीत असतां त्याला येथे ( योग्य ) स्थान मिळतें हाहि एक लक्षणीय योगायोग म्हटला पाहिजे ! कांही असो, राष्ट्रीय आशयवादी कवितेबाबतचा संपादकीय रुचिभेद आपणांला जरी पटला नाही तरी निदान तशा अ-समावेशाचा लोप ( omission ) येथे झाला नाही याबद्दल आपणांला आनंद व्हावा.

या संग्रहाबद्दल अनेक आक्षेप अनेकांच्या मनांत उद्भूत होणें शक्य आहे. एक आक्षेप असा आहे की, यांत तर आम्हांला त्या त्या कवीची माहिती असलेली कविताच आलेली आहे ! पण हा तर या संग्रहाचा गुणच समजला पाहिजे. याहून अधिक सबळ आक्षेप कवितांबद्दलच्या निवडीसंबंधांत घेतले जातात. यशवंतादि कवींच्या विस्तृत काव्य-सृष्टींतून निवड करणें कठिणच. परंतु कांही कवींबाबत असें म्हणतां येईल की निवड जरा निराळी व विस्तृत करावयास हवी होती. तरीहि एकंदरीने पाहतां जी ऐतिहासिक क्रमाची आणि काव्यप्रकार व काव्यप्रवाह यांच्या वाढीची दृष्टि संपादकांनी पुढे ठेवली होती त्या दृष्टीने त्यांचा हा प्रयत्न अत्यंत यशस्वी झालेला आहे असें मला वाटतें. माडखोलकरांची कविता द्यावयाची तर फडके ('वनाकिशोर') किंवा खांडेकर ('कुमार') यांच्या निवडक

कविता तर अवश्य यावयास पाहिजे होत्या, असें आपणांस वाटणें स्वाभाविक आहे. किंवा स. अ. शुक्ल यांची कविता द्यावयाची तर शांताराम आठवले यांची न देण्यांत स्वारस्य नाही असेंहि मनांत आल्यास तें फारसें अनुचित म्हणतां येणार नाही. टेकाडे-तिवारी यांचीं काव्यें दिलीं त्याबद्दल कुरकुर नाही. पण मग गोविंद, साने गुरुजी यांच्या या संग्रहाच्या काल-मर्यादेंत येणाऱ्या कवितांना प्रातिनिधिकत्व द्यावयास पाहिजे असें न्यायानें म्हणतां येईल. पण संपादकांची काव्यदृष्टि व त्यांच्यापुढें असलेल्या कामाचें अवाढव्य स्वरूप आणि मुद्रण-प्रकाशनाबाबतच्या चालू काळांतील अतिशय दुर्लंघ्य अडचणी यांचा विचार करतां या उणीवा क्षम्य वाटतात. तरी घाईघाईत काम उरकण्याच्या ज्या खुणा या ग्रंथांत निवडीपासून छपाईपर्यंत आढळतात, त्या मात्र क्षम्य नाहीत. अशा तऱ्हेचा वैशिष्ट्यपूर्ण प्रातिनिधिक संग्रह जरा कालावधीनें पण अधिक काळजीपूर्वक व्हावयास हरकत नव्हती.

मुहूर्त साधण्याची घाई लग्नसमारंभांत योग्य पण असा अपूर्व प्रातिनिधिक काव्यसंग्रह प्रकाशिण्याबाबत ती क्षम्य म्हणतां येणार नाही. मात्र अगदीं कालच्या कवींपैकीं चांगल्यांना येथे स्थान दिलेलें आहे याचें अर्थातच आपणांस कौतुक वाटावें. ज्यांना ज्यांना स्थान मिळालें त्यांच्या योग्यतेविषयीं किंवा समावेशाविषयीं कोणासच कांही वाटूं नये. कांही अधिक कवी समाविष्ट झाले असते तर तें अधिक बरें झालें असतें एवढेंच समावेश झालेल्या ऐशी कवितांत तेवढीच चांगली भर पडली असती.

म्हणूच " महाराष्ट्र-शारदे "च्या नंतर इतका चांगला व खऱ्या अर्थानें ( बहुतांशीं ) प्रातिनिधिक असा हा कवितासंग्रह प्रकाशित करण्याचें महत्कार्य पार पाडल्याबद्दल या संग्रहाचे संपादक आणि मुंबई मराठी साहित्य संघ यांचें आपण एकमतानें अभिनंदनच करावें असें मला वाटतें. कारण या संग्रहाचें ( वर निर्दिष्ट केलेलें ) उद्दिष्ट सफल झालें आहे. तांब्यांपासून सूर्यकांत खांडेकरांपर्यंतच्या बहुतेक जुन्या-नव्या कवींच्या काव्यप्रवृत्ति यांत दिग्दर्शित झाल्या आहेत. भावकाव्यात्म गीतरचनेचें विकसित स्वरूप, सुनीताचा प्रादुर्भाव आणि अस्त, विडंबनाची एकलांबी द्वारका, आनंद-ठोकळ-पाटील-पारधी यांच्या गीतांत दिसणारा ग्रामीण जीवनाचा आविष्कार, वर विस्तारानें आलेला मुक्तछंद आणि ' नव कविता ' यांचा उगम व विकास आणि मुक्तछंदाचा गतिविरोध इत्यादि काव्यांतील प्रकार-प्रवृत्ति-प्रवाह येथे योग्य प्रकारें प्रातिनिधिकत्व पावले आहेत. मात्र हा संग्रह म्हणजे अगदी निवडक भावकाव्याची एखादी " गोल्डन ट्रेझरी " किंवा " हैम-कोष " नव्हे हें लक्षांत ठेवलें पाहिजे. पण असें असतांहि प्रधान्यानें यांत भावगीतात्मक रचनेचाच इतिहास गुंफलेला आहे. आपल्या मराठी काव्याच्या प्रकृतीचें कांहीसें बिनचुक निदान करावयाला हें साधन आपणांला उपलब्ध झालें आहे. आपली कविता भावकाव्याच्या प्रांतांतहि अजून अपूर्व विविधतेनें व रूपांनीं पृथगात्म आणि व्यक्तित्वपूर्ण रचनाप्रयोगांनी अत्यंत समृद्ध झालेली आहे असें कोणाहि चोखंदळ रसिकाला म्हणतां येणार नाही. उलट तिचा कल साचेबंदी स्वीकारण्याकडेच अधिक झुकलेला दिसतो. मराठी काव्यांत अधिकाधिक साहसी आणि निडर असे प्रयोगवीर पुढे आले पाहिजेत—व जे पुढे येत आहेत त्यांना उत्साह करील असें वातावरण आपण सतत टिकविलें पाहिजे. या प्रयोगांची पुढची शक्यता कोणची आहे तें मागील विकासाच्या पार्श्व-भूमीवर या संग्रहांत आपणांस सूचित झालेलें आढळतें. हेंच या संग्रहाचें यश आहे.

—ना. ग. जोशी

**बापूजींची ओझरतीं दर्शनें**—[ ले० दत्तात्रेय बाळकृष्ण कालेलकर, प्रका० नवजीवन प्रकाशन मंदिर, अहमदाबाद; पृ. १५० किं. १॥ रु. ]

गांधीजींच्या स्वभावाचे निरानिराळे पैलू प्रकाशित करणाऱ्या या आठवणी आचार्य कालेलकरांनी शिवणी तुरुंगांत सांगितलेल्या आहेत. "ज्या ज्या लोकांपाशीं बापूंचीं असलीं संस्मरणें असतील त्यांनी त्यांनी आपला हा खजिना जगासमोर मांडावा. गांधीयुगाचा हा वारसा मानवजातीला अवश्य मिळाला पाहिजे" हे आचार्यांचे प्रस्तावनेंतील उद्गारच या पुस्तकाचें महत्त्व यथार्थपणें सांगतात.

मराठींत गांधीजींच्या आठवणींचीं पांच सात पुस्तकें निघालीं आहेत. पण हीं 'दर्शनें' विशेष मनोरम व उपयुक्त आहेत. पुष्कळ वेळां आठवणी म्हणून विवेचनपर निबंधच वाचकांच्या हातीं पडतात. पण चरित्रनायकाच्या लहानमोठ्या स्वभावगुणांवर उजेड पाडणाऱ्या नाट्यपूर्ण किंवा रसपूर्ण घटना निवेदणाऱ्या खऱ्याखुऱ्या आठवणी या ग्रंथांत खूपच आहेत. याचें कारण काकासाहेबांना लाभलेला गांधीजींचा निकट सहवास हें तर आहेच, पण त्याशिवाय त्यांची बहुश्रुत व चिकित्सक दृष्टि हेंहि आहे.

ना. गोखले यांना गांधीजी गुरु कां मानीत याचें जें 'विश्लेषण' काकासाहेबांनीं पृ. ६७ वर केलें आहे, तें धाष्ट्यांचें असलें तरी सत्यच आहे. तें एक काकाच करूं जाणें ! "बापू जर माझें तोंड पहाणार नाहीत तर मी जगूं कसा ?" हे महादेवभाईंचे आर्त उद्गार ( पृ. ४१ ) वाचतांना कोणता सहृदय वाचक गहिंवरणार नाही ? तसाच गिरसप्पाचा प्रसंग, लो. टिळकांचें स्वागत ( पृ. ४५ ), हरिजन जोडप्याला आशीर्वाद ( पृ. ९५ ), कर्वे यांचा सत्कार ( पृ. १२० ) इत्यादि प्रसंग वाचतांना हृदयांत नानाविध भावना उचंबळून येतात !

भाषांतर करण्यास श्री. बोरकरांसारखे कवि व कादंबरीकार लाभले हें मराठी वाचकांचें भाग्यच ! सफाईदार व रसपोषक शब्दरचना सर्वत्र आहे. अपवाद म्हणून विरळ आत्मा ( पृ. २२ ), आश्रमाचे सभ्य ( पृ. २७ ) पदार्थपाठ ( पृ. ४० ), उतारा (पृ. ८०), समांतर ग्रंथ ( पृ. ११३ ), तिच्यांत हजर ( पृ. १२५ ), चिंतित ( पृ. १३७ ) असे कांहीं शुद्ध पण रूढ नसलेले शब्दप्रयोग आढळतात.

"शिक्षित लोकांमधील दयाभाव आटला आहे" ही गांधीजींना सर्वांत चिंताजनक गोष्ट वाटे. ही आठवण 'पत्रिके'च्या सुबुद्ध वाचक वर्गाला काहीं प्रेरणा देऊं शकेल काय ?

—दा. न. शिखरे.

**परिपूर्ति**— [ लेखिका– 'क.' प्रका०– पु. आ. चित्रे; किं १ रु. ]

महाराष्ट्रांतील विख्यात समाजशास्त्राध्यापिकेने 'अभिरुचि' मासिकांतून केलेल्या लेखनाचा हा छोटा संग्रह वैशिष्ट्यपूर्ण आहे. लेखिकेने आपलें नांव जरी प्रकट केलेलें नसलें तरी तें मुद्दाम लपवून ठेवण्यांत लेखिकेला कांहीं कलापूर्णता साधावयाची नाही ह्याचा स्पष्ट पुरावा पानापानावर दिसून येतो. लेखिकेच्या निदिध्यासाबरोबरच जें मार्मिक अवलोकन झालें, त्याच्या विविध प्रतिक्रिया म्हणजेच हा छोटा लेखसंग्रह आहे. लेखसंग्रह असें म्हणण्याचें कारण असें की लेखिकेने कोणतीहि घटना विशिष्ट पद्धतीनें आविष्कृत करण्याचा आग्रह धरलेला नाही. परंतु, 'प्रेमाची रीत', 'वेड लागलेलें घर', 'स्त्री आणि संस्कृति' ह्या लेखांना मनोहर

गुजगोष्टींचें स्वरूप मूलतःच लाभलेलें आहे. 'जन्मांतरींची भेट' ही एक गूढगंभीर कथा स्वाभाविकपणें आविष्कृत झालेली आहे. 'महार आणि महाराष्ट्र', 'बीजक्षेत्र' हे लेख चिंतनशील स्वरूपाचे आहेत. 'परिपूर्ति' या गुजगोष्टीचा शेवट इतका कलापूर्ण आणि हृदयस्पर्शी आहे की वाचणाऱ्याच्या अंतःकरणांत अनामिक अशी हुरहूर निर्माण होते. पण शेवटल्या तीन ओळी अत्यंत रसभंगकारक आहेत. त्या नसत्या तर फार चांगलें झालें असतें. 'क' ची भाषा, वर्णनें, सूक्ष्म अवलोकन आणि विनोदपूर्ण टीका ह्या गुणांचा प्रत्यय सहज येतो. मराठींतील हें छोटें पण मधुर लेखन स्वागतार्ह आहे यांत संशय नाही.

विचि ता—[ले०—शं. बा. शास्त्री; प्रका०—नागपूर प्रकाशन; किं २ रु.]

वायकांची जात—[ले०—ल. ना. भावे; प्रका०—केमकर आणि मंडळी; किं. २ रु.]

वरील दोन्ही पुस्तकांचा परामर्श एकत्र घेणें अनेक दृष्टींनी सोयीचें आहे. परंतु आणखी एक महत्त्वाची गोष्ट ही की हे दोनहि संग्रह नभोनाटिकांचे आहेत. नभोनाटिकाविषयक वाङ्मय मराठींत अत्यल्प आहे. त्या दृष्टीने मी या दोन्ही संग्रहांचें मनःपूर्वक स्वागत करतों. परंतु दोन्ही पुस्तकांत अनेक दृष्टींनी विरोधच आहे. 'विचित्रता' या संग्रहाचे लेखक श्री. शास्त्री हे चांगले लेखक म्हणून परिचित आहेत. परंतु या त्यांच्या नभोनाटिकांमुळे संपूर्ण निराशाच वाचकांच्या पदरांत पडते. अलका मुखोपाध्याय यांनी जें संपादन केलेलें आहे तें तर अगदीच गूढ आणि अनाकलनीय आहे. त्यांनी सांगितलेले कोणतेहि गुण शास्त्री यांच्या नाटिकांत आढळत नाहींत. उलट बोजड भाषा, चमत्कारिक संवाद, कृत्रिम कल्पना यांनीच सर्व मूळ विषयाला झांकाळून टाकलेले आहे. श्रुति–गुण म्हणून त्यांना कांहीहि महत्त्व नाहीं. 'चाहूल' ही नभोनाटिका मात्र सुंदर आहे. पण तिचेंहि सामान्य लोकांना आकलन होणें कठिण! अर्थात् त्यांतील श्रुतिगुण आणि लेखनचातुर्य पाहून एरिक् मिल्नच्या 'He comes home' या गाजलेल्या नाटिकेची छाया तर या नाटिकेवर पडली नसेल ना अशी शंका येणें अपरिहार्य आहे. परंतु या सर्व नाटिकांतून हृद्य व प्रयोगक्षम असें कांहीहि नाहीं. पण याच्या अगदीं उलट गोष्ट श्री. भावे यांच्या संग्रहाची आहे. श्री. भावे यांनी आपल्या नाटिकांची मांडणी रंगभूमीवर करण्याच्या दृष्टीने केलेली असल्यामुळे, नभोनाटिका म्हणून त्यांचें ध्वनिक्षेपण करण्याच्या सर्व सूचना व रचना या पुस्तकांत आढळत नाहींत ही उणीव त्यांना सहज भरून काढतां आली असती. यामुळे नव्या नभोवाणीलेखकांना आपोआप मार्गदर्शन झालें असतें. 'जिवाला जीव' या नाटिकेचा शेवट चांगला असूनहि त्याची रंगत कांही कृत्रिम घटनांमुळे कमी झालेली आहे. तथापि संवाद, रचना, स्वभावलेखन आणि श्रुतिगुणप्रामाण्य या दृष्टीने श्री. भावे यांचें लेखन फारच वरच्या दर्जाचें आहे. श्री. भावे यांच्या नाट्यलेखनाचा मराठी रंगभूमीला आणि नभोवाणीला फार मोठा उपयोग खचित होईल. हीं दोन्ही पुस्तकें एका वेळीं वाचल्याने नभोनाटिका कशा नसाव्यात व कशा असाव्यात याचें प्रत्यंतर आपोआप येतें. तरी देखील श्री. शास्त्री यांच्या प्रयत्नाबद्दल आणि श्री. भावे यांच्या सुंदर लेखनाबद्दल मी उभयतांचें अभिनंदन करतों. असल्या वाङ्मयप्रकाराला सक्रिय उत्तेजन देणाऱ्या प्रकाशकांनाहि धन्यवाद.

मधू— [ ले०:—द. ए. सुगांवकर; प्रकाशक–नागपूर प्रकाशन; किं. २॥ रु. ]
जीवनसाथी—[ले०:— माई ऐतिवडेकर व प. त्रिं. सहस्रबुद्धे; प्रकाशक— अभिनव प्रकाशन, मुंबई किं. ४ रु. ]

'मधु' आणि 'जीवनसाथी' ह्या दोन्हीहि कादंबऱ्या आहेत. शिवाय 'मधू'च्या प्रस्तावनेंत (स्वतःच्या किंवा त्यांनीच प्रकाशित केलेल्या पुस्तकांना डझनावारी प्रस्तावना लिहिणारे) श्री. सातोस्कर सांगतात की श्री. सुगावकरांनी 'कसें लिहिलें' एवढेंच पहावें! तर 'जीवनसाथी'च्या लेखकद्वयाचा असा दावा आहे कीं दोन व्यक्तींनी लिहिलेली पत्रात्मक कादंबरी हें नवें तंत्र आणि म्हणून हा प्रयोग अभिनव आहे. श्री. सातोस्करांसारख्या पंडितानें श्री. सुगावकरांचें कौतुक करून एका नव्या लेखकाला अन्याय केलेला आहे. तर 'जीवनसाथी'च्या लेखकांनी तंत्राबद्दल स्वतःच भ्रम निर्माण करून स्वतःलाच अन्याय केलेला आहे. दोन वेगळया व्यक्तींनी लिहिलेलीं पत्रें एकत्र छापलीं कीं नवी तंत्रात्मक कादंबरी तयार होते हा समज श्री. सहस्रबुद्धे व माई ऐतिवडेकर यांनी टाकावा. मराठींत मात्र ही चीज नवी आहे हाच एकमेव विशेष मानावयाचा असेल तर कांहींच म्हणणें नाही. तद्वतच प्रो. फडक्यांच्यासारखें लिहावयाचा संकल्प सोडतांना आपण व्याकरणाच्या, इंग्रजीच्या, स्थलकालमर्यादेच्या, स्वभावलेखनाच्या हजारों चुका किती प्रमाणांत करीत आहोंत व श्री. सी. डी. देशमुखांच्यासारख्या वंदनीय व अधिकारी पुरुषाच्या नांवाचा उपयोग करून केवढी चूक नकळत वा कळून करीत आहोंत याचा तरी विचार श्री. सुगांवकरांनी करावयास हवा होता. कारण त्यांची 'मधू' ही कादंबरी म्हणजे प्रो. फडक्यांच्या 'दौलत' या कादंबरीची, थोडक्याशा फरकानें केलेली भ्रष्ट नक्कल आहे. तर प्रचलित सरकारवर कलाहीन व विपर्यस्त टीका करून 'जीवनसाथी'च्या लेखकद्वयानें आपलें साम्यवादाबद्दलचें प्रकांडपांडित्य प्रकट केलेलें आहे. 'जीवनसाथी' ही कादंबरी कोणत्याहि अर्थानें कलात्मक नाही. उलट त्यांतील उसना आवेश आणि कळकट भाषा उद्वेगच आणणारी आहे. अर्धवट राजकीय मतें साहित्यरूपानें आविष्कृत करतांना जो कलाहीन गोंधळ उत्पन्न होणें शक्य आहे तो सर्व 'जीवनसाथीं'त प्रत्ययाला येतो.

—(प्रा.) चंद्रकुमार डांगे

## नवीन महत्त्वाचीं प्रकाशनें

या अंकांत ज्यांचा परामर्श घेतां येणें शक्य नव्हतें अशा कांहीं महत्त्वाच्या नवीन ग्रंथांचा येथे उल्लेख करणें जरूर आहे. प्रा. न. र. फाटक यांनी लिहिलेला '**श्रीएकनाथ, वाङ्मय आणि कार्य**' हा ग्रंथ प्राचीन मराठीच्या अभ्यासकांना अनेक दृष्टींनी उपयुक्त वाटेल. '**संतवाङ्मयाची सामाजिक फलश्रुति**' हें प्रा. गं. बा. सरदार यांनी लिहिलेलें व म. सा. परिषदेतर्फे प्रसिद्ध झालेलें पुस्तक संतवाङ्मयाच्या चिकित्सक वाचकांना महत्त्वाचें वाटेल. प्रा. श्री. म. माटे यांच्या कांहीं प्रौढ व भारदस्त निबंधांचा संग्रह '**विचारशलाका**' या नांवानें प्रसिद्ध झाला असून प्रा. माटे यांच्या विचारसरणीचा व मनोरम शैलीचा त्यांत सर्वत्र आविष्कार झालेला आहे. प्रा. रा. शं. वाळिंबे यांचा '**साहित्यांतील संप्रदाय**' हा ग्रंथ नुकताच प्रसिद्ध झाला आहे. क्लॅसिसिझम् (अभिजातवाद), रोमॅंटिसिझम् (स्वच्छंदवाद), रिॲलिझम् (वास्तववाद) या वाङ्मयीन संप्रदायांचा सांगोपांग विस्तृत इतिहास या ग्रंथांत दिलेला असून त्या निमित्तानें रोमॅंटिसिझम्‌च्या तत्त्वांच्या अनुरोधानें महाराष्ट्रांतील आधुनिक काव्याचें विस्तृत विवेचन केलेलें आहे.

१३ ,, पुरुषोत्तम सोमनाथ कान्त,
१७१ अ, बुधवार, पुणें २.

१४ ,, विठ्ठल केशव डिंगरे, टिळक कॉलेज ऑफ एज्यु. पुणें २.

१५ डॉ. मंजुलाल रणछोडदास मुजुमदार, प्रतापगंज, बडोदें.

१६ श्री. माधव हरि टिळक, १ बाबुलनाथ रोड, मुंबई ७.

१७ ,, गणेश नारायण वालावलकर, ११६ चर्नी रोड; मुंबई ४.

१८ ,, वसन्त अनन्त कुंभोजकर, ६५६ जुनी सांगली, सांगली.

१९ ,, गणेश वासुदेव करंदीकर, मेनरोड, सांगली.

२० ,, माधव जगन्नाथ तांत्रे, 'श्री', विश्रामबाग, सांगली.

२१ ,, बाळकृष्ण महादेव गद्रे, हरभट रोड, सांगली.

२२ ,, सदाशिव विष्णु तुळपुळे, राधाकृष्ण, एक्स्टेन्शन्, सांगली.

२३ ,, यशवन्त नारायण मोघे, बिरलानगर (ग्वाल्हेर)

२४ सौ. राधाबाई पांडुरंग आपटे, ६३१।१२ माडीवाले वसाहत, पुणें २

२५ श्री. पांडुरंग श्रीधर आपटे, ६३१।१२ माडीवाले वसाहत, पुणें २

२६ ,, हुसेन अहमद नदाफ, बोरगांव (द. सातारा)

२७ ,, दत्तात्रय पांडुरंग साने, चिपळूण (रत्नागिरी)

२८ ,, जनार्दन शंकर आपटे, जमाखिंडी.

२९ ,, नरेश भिकाजी कवडी, ६७९ द. कसबा, सोलापूर.

३० ,, गणेश पंढरीनाथ कुलकर्णी, ७१ नवीपेठ, सोलापूर.

३१ सौ. प्रभावती नृसिंह केसकर, १४४ शुक्रवार, सोलापूर.

३२ श्री. पंचपा शिवशंकरपा जिरगे, ६२० शुक्रवार, सोलापूर

३३ सौ. काशीबाई लेले, पोलीसक्लबजवळ, सोलापूर.

३४ श्री. गोविंदराव शिल्पकार, ६८१ उ.कसबा, सोलापूर.

३५ ,, हरिहर गुरूनाथ खलगरकर, (कुंजविहारी) ओनामामंदिर, सोलापूर

३६ ,, वसंत रामचंद्र सरनोबत, ४७६ शनिवार, पुणें २

३७ सौ. इंदिराबाई पाटणकर, बळीरामपेठ, जळगांव (पू. खा.)

३८ ,, हरिहर सीताराम उर्सेकर, ६२३।६ सदाशिव, पुणें २

३९ ,, रमाकांत का. बक्षी, कोळीवाडा, ठाणें.

४० ,, रामचंद्र पंढरीनाथ पाटील, कुर्डूवाडी (सोलापूर)

४१ ,, माधव नारायण जोशी, क. डिग्रज (व्हाया सांगली)

४२ ,, भ. स. थोंड (परळीकर), मु. पो. पिंगळी (जि. परभणी)

अनुक्रमणिका

# साभार स्वीकार

१ टॉलस्टॉयच्या स्मृति— अनु. स. शं. देसाई; प्रका. मो. बि. खोलकर, माने मॅन्शन्, पुणें ४; मूल्य १। रु.

२ तीर्थंकराची प्राचीनता–ऐतिहासिकता व जिनशासन—ले. रा. ने. शहा, वकील, सोलापूर; मूल्य २ रु.

३ संगीताचे मानकरी—ले. एकलव्य; परचुरे प्रकाशन मंदिर, मुंबई ४; मूल्य २॥ रु.

४ मुंबईचे मानकरी—ले. बा. वा. फाटक; परचुरे प्रकाशन मंदिर, मुंबई ४; मूल्य २ रु.

५ कठोपनिषद् (श्लोकबद्ध रूपान्तर)— अनु. महाराष्ट्रीय; प्रका. रा. ना. पाटणकर, राजापूर (रत्नागिरी), मूल्य २ रु.

६ बोधिसत्व (नाटक)—ले. धर्मानंद कोसंबी, प्रका. व्होरा आणि कं. काळबादेवी रोड, मुंबई २; मूल्य १॥ रु.

७ पार्श्वनाथाचा चातुर्याम धर्म—ले. धर्मानंद कोसंबी, प्रका. व्होरा आणि कं., काळबादेवी रोड, मुंबई २; मूल्य १॥। रु.

८ कुमार एकलव्य—ले य. प. मुसळे प्रका. भं. वि. ठक्कर, रावपुरा, बडोदें, मूल्य ८ आणे.

९ स्वर्ग या प्रतिस्वर्ग (हिंदी)—ले. द. श्री. देऊस्कर, प्रबोध प्रकाशन संस्था, गणपति मंदिर, सांगली; मूल्य ८ आणे.

१० अङ्कपाश—ले. व प्रका. आ. बा. लिमये, १२७ (२) सदाशिव, पुणें २; मूल्य १२ आणे.

११ कुमारांचा सोबती—ले. व प्रका. य. गो. नित्सुरे; कचरेवाडी पुणें ४; मूल्य २॥ रु.

१२ विचित्रिता (नाटक)—ले. शं. बा. शास्त्री; नागपूर प्रकाशन, सीताबर्डी, नागपूर; मूल्य २ रु.

१३ मधु—ले. द. ए. सुगांवकर, नागपूर प्रकाशन, सीताबर्डी; नागपूर; मूल्य २॥ रु.

१४ लकेरी—शरचंद्र टोंगो, नागपूर प्रकाशन, सीताबर्डी; मूल्य २॥ रु.

१५ भक्तिरसामृत भजनावली—ले. स. गं. सोनवणे, प्रका. आ. व. कुटे, ८६४ रविवार, पुणें २; मूल्य २ रु.

१६ भर दुपारच्या अंधारांत—ले. आर्थर कोसलर, अनु. वसंतराव नारगोलकर; प्रका. महाराष्ट्र ग्रंथ भांडार, कोल्हापूर मूल्य ६ रु.

१७ ब्रह्मविद्या आणि तिच्याभोंवतीं उत्पन्न झालेलें अविद्यारण्य—संपा. म. दा. गाडगीळ; प्रका. य. ग. वझे, ४१४ सदाशिव, पुणें २; मूल्य ४॥ रु.

१८ गीतप्रभा (भावगीतें)—प्रभावती केसकर, प्रका. का. अ. जोशी, मुगभाट, मुंबई ४; मूल्य ८ आणे.

१९ भूमीला भार (नाटिका)— लेखिका. सौ. विमल काळे; प्रका. काकोडकर ग्रंथभांडार, हरभटरोड, सांगली; मूल्य १२ आणे.

२० सानेगुरुजी—ले. शीलभद्र; चित्रशाळा प्रकाशन, पुणें २; मूल्य.

२१ दोला (कविता)—पु. शि. रेगे; प्रका. द. वा. नाईक, सदानंद मुद्रणालय, पणजी (गोवा), मूल्य ३ रु.

२२ साधनचतुष्टय (जे. कृष्णमूर्ति) —भाषांतरकार कै. काशीबाई कानिटकर; प्रका. मराठी थिऑ. फेडरेशन, पुणें ४; मूल्य ८ आणे.

२३ विचार-शलाका—ले. व प्रका. प्रा. श्री. म. माटे, नातूबाग, पुणें २; मूल्य २॥ रु.

२४ झटापट (लावण्या)—कवि शं. द. भोसले; प्रका. भारत कलापथक, शुक्रवार, कोल्हापूर; मूल्य ४ आणे.

२५ लो. टिळक—ले. ना. सी. फडके, प्रका. रामकृष्ण बुकडेपो, गिरगांव, मुंबई ४; मूल्य १२ आणे.

२६ नव्या वाटा (नाटिका)—ले. आनंदीबाई किर्लोस्कर, प्रका. किर्लोस्कर प्रेस, किर्लोस्कर वाडी; मूल्य १॥ रु.

२७ पांगारकर आणि मुक्तेश्वर—ले. पां. जि. सबनीस, प्रका. पांगारकर स्मारक मंडळ, दिल्ली दरवाजा, नाशिक; मूल्य ७ आणे.

२८ श्रीएकनाथ वाङ्मय आणि कार्य—ले. प्रा. न. र. फाटक; मौज प्रकाशन लि. मुंबई ४; मूल्य ६ रु.

२९ आमची माती-आमचें आकाश—ले. अनंत काणेकर; मौज प्रकाशन लि. मुंबई ४; मूल्य ४॥ रु.

३० अर्वाचीन महाराष्ट्रांतील सहा थोर पुरुष—ले. प्रा. न. र. फाटक; प्रका. ब्राह्मणसभा, मुंबई; मूल्य १ रु.

३१ ईशावास्योपनिषद् (मराठीश्लोकांसह)— अनु. व प्रका. भय्यासाहेब पंत, पंतगोट, सदाशिव, पुणें २; मूल्य ४ आणे.

३२ विश्वमानव (कविता)— ना. ग. जोशी; प्रका. सुलभ राष्ट्रीय ग्रंथमाला, टिळक रस्ता, पुणें २; मूल्य २। रु.

३३ कोंकण-कथा—ले. कृ. के. रहाळकर; प्रका. कुलकर्णी ग्रंथागार, १८६ शनिवार, पुणें २; मूल्य १॥ रु.

३४ नव्या वाटा (कथा)—ले. गंगाधर गाडगीळ; प्रका. लाखाणी बुकडेपो, मुंबई ४; मूल्य २ रु.

३५ हिमशिखरें (गद्यगीतें)—ले. कांती बुधे; वीणाप्रकाशन, सीताबर्डी, नागपूर, मू. २ रु.

३६ अपराध कुणाचा ? (कादं.)-ले. व प्रका. ना. रा. अभ्यंकर, १४ नावलकर बिल्डिंग, खाडिलकर रोड, मुंबई ४; मूल्य ४ रु.

३७ जात्युच्छेदक निबंध— ले. वि. दा. सावरकर, विश्वास प्रकाशन, गायवाडी, मुंबई ४; मूल्य ५॥ रु.

३८ विज्ञानयुगाचे निर्माते—ले. प्रा. ना. वा. कोगेकर, अ. वि. गृह प्रकाशन, सदाशिव, पुणें २; मूल्य १२ आणे.

३९ सोपपत्तिक नागरिकशास्त्र—ले. प्रा. रा. वि. ओतूरकर; अ. वि. गृह प्रकाशन, सदाशिव, पुणें २; मूल्य १॥। रु.

४० श्रीसंत तुकोबाराय—ले. व प्रका. गो. शं. राहिरकर, ७७० शुक्रवार पुणें २; मूल्य १॥ रु.

४१ महाराष्ट्र महोदय (लेखसंग्रह)— प्रका. वा. पु. भागवत, मौज प्रकाशन लि. गिरगांव, मुंबई ४; मूल्य १। रु.

४२ साहित्यांतील संप्रदायः—ले. प्रा. रा. शं. वाळिंबे; प्रका. पॉप्युलर बुक स्टोअर, सुरत; मूल्य ६ रु.

अनुक्रमणिका